# किल्ले प्रतापगड निवासिनी
# श्रीप्रतापदुर्गमाहात्म्यम्




संशोधक, संपादक, अनुवादक

डॉ. सदाशिव शिवदे
डॉ. स. मो. अयाचित

ग्रंथकर्त्यांचे वंशज श्री. बाळकृष्ण दीक्षित आपल्या ऐतिहासिक वाड्यासह



गोदावरी आणि सिंधूफेना नद्यांचा संगम - श्रीक्षेत्र मंजरथ, ता. माजलगांव, जि. बीड

तः॥३७॥ संवादस्तोऽस्त योः प्रोक्तो युष्माकं कलिसंभवः॥
एवं प्रोक्तं दीक्षितस्य स्वामिनकस्य तथा पुनः॥३८॥ रा
त्र्योश्चापि सविस्तारं वंशादि कथनं मया॥ यदत्र ज्ञा
विवृत्तं तच्छ्रवणान्मंगलप्रदं॥३९॥

अधुनाहं प्रवक्ष्यामि

१३

शिवराजे यथांबिका॥ जाता प्रसन्ना पूर्वं तु शाहु
प्राणप्रियेनघे॥१॥ शिवांशाज्जनितो शिवराजोप्र
तापवान्॥ प्रतापदुर्गविरतः शाहराजात्मजः सुधीः॥
॥२॥ मालवन्नृपतेः पौत्रो शाहूराज्ञः पितामहः॥ शा
केस्त्री शालिवाहे त्रंकबाणशैरक्ष्मिते ५१ ३॥
शुक्लसंवत्सरे पुण्ये शिशिरे चोत्तरायणे॥ फाल्गु

प्रता.दु. ×श्रीसत्यमंगायत्रज×१ मा.अ. १४

नस्यासिते पक्षे तृतीयायां सुलग्नके॥४॥ निशा
यामतिशुद्धायां प्रोच्चस्थे ग्रहपंचके॥ शिवनेर
गिरावेव पुत्रस्य जन्म बभूव तत्॥५॥ जयार्थी सि
शिवः एवं जगाम तुळजापुरं॥ तत्र स्थितां तुळजांना
म्नीं समाराधयदादरात्॥६॥ पश्चान्निजसभागे नै
वचिरकाळं व्रतस्थितः॥ स्वप्ने मध्ये ब्रवीद्देवी शि
वं शारणमागतं॥७॥ त्वत्पूर्वजन्मार्जितपुण्यसंघैः
समर्चनेनापि तवाधुनात्र॥ त्वद्दैवयोगाद्धि ...
तस्मात्तुष्टा वराम्यपश्च जवात्प्रसन्ना॥८॥ ...
... भूमि देवे स्थिता स्मि पूर्वं विधिपत्र काळे॥
समर्चिता तत्र सुरैर्मुनीन्द्रैर्बल्यादिकास्तोदितिजा जि
ता हि॥९॥ प्रतापवीर्येण हतः क्षणेन स्वकर्णरूपा
पपातश्च तत्र॥ नानाजनैस्तीव्रसदैव तत्कायारा

॥श्री॥ ॥२॥ ॥राम॥ ॥२॥ दे १०

श्रीप्रतापदुर्गमाहात्म्यम्

(छ. शिवाजी महाराजांच्या जन्मतिथीचा उल्लेख)

मः कपटं कृत्वा स्वशिरो नम्रितं चिदं ॥ ९ ॥ इति
तद्गर्वसंयुक्तं धाष्ट्र्यं वाक्यं भयावहं ॥ श्रुत्वा
सोफजलो वेगात्प्रसार्य स्वीयदोर्लताः ॥ १० ॥
तं समालिंगितुं तस्य पुरो गच्छत्तदंतिकं ॥ तं द
ष्ट्वा लिंगने युक्तं शिवाजी स्वीयदोर्लताः ॥ ११ ॥
संप्रसार्यातिवेगेन प्रययौ तत्पुरस्तदा ॥ ततस्तौ
पर्वताकारौ स्पर्शितौ च परस्परं ॥ १२ ॥ कक्षा
स्यांपृष्ठदेशे तु स्कुंजौ निष्कार्यपलतः ॥ आलिं
गनं च कृतुस्तौ द्वौ शिवाफज[illegible]कयौ ॥ १३ ॥
तदा सोफजलो वेगाज्जठरा[illegible]स्य चर्क चुकात् ॥
निष्काष्य स्फलमहत्वा क्षणं तत्कुक्ष्यां रोपयत्खव
ळः ॥ १४ ॥ तदागं चंचलं कृत्वा शिवः कवचगोपि
तं ॥ चकार विफळं तस्य समुद्योगं स्वलीलया ॥ १५ ॥

॥श्री॥ ॥४७॥

॥राम॥ ॥४८॥

ततः शिवोपि वेगेन स्वकरोर्ध्वं स्वकं चुकात् ॥ प
ष्ठिदेशे नासितं तद्बहिर्निष्काष्य लीलया ॥ १६ ॥
स्वरिपोः कुक्षिदेशे [illegible] तु रोपयित्वा बळेन हि ॥
तदंत्रजाळं [illegible] जठराद्बहिर्निष्कारयत्क्ष
णात् ॥ १७ ॥ तदा सोफजलो भूमौ देशे जावलिको
रजे ॥ न्यपतत्पर्वताकारो भ्रामयन्सर्वतोक्षि
णी ॥ १८ ॥ दितिजांशस्समुद्भूतः शिवांशजनिताच्छि
वात् ॥ मृतिमापमहादुष्टो यवनोफजलाह्वयः ॥
॥ १९ ॥ भूम्यष्टशरभूसंख्ये मिते १५८१ श्रीशा
लिवाहजे ॥ शाके विकारिवर्षेत्र मार्गशीर्षासि
ते गुरौ ॥ २० ॥ सप्तम्यां चैव माध्याह्ने देशे जावल
कोरजे ॥ दुर्गादत्तासिते नैव शिवेनाफजलो हतः ॥
॥ २१ ॥ वाद्यामास हर्षेण शिवाजी करतालिकां ॥

श्रीप्रतापदुर्गमाहात्म्यम्

(अफजलखानाचा वध शिवाजी महाराजांनी केल्याचा व त्या तिथीचा उल्लेख)

किल्ले प्रतापगड निवासिनी

# श्रीप्रतापदुर्गामाहात्म्यम्

(श्री शिवछत्रपती चरित्राचे साधन)

संशोधक, संपादक, अनुवादक

## डॉ. सदाशिव शिवदे

## डॉ. स. मो. अयाचित



धियोयोनः प्रचोदयात्

विश्वामित्र प्रकाशन,

पुणे

# अनुक्रम





# स्वागत..!

छत्रपती शिवाजी महाराजांच्या चरित्रावर गेल्या शंभर वर्षांत बरेचसे संशोधन झाले. विश्वसनीय पत्रव्यवहार व अन्य साधने संशोधकांना गवसली. काही विचारवंत अभ्यासकांनी, गवसलेल्या या सर्व साधनांचा अभ्यास करून संकलनात्मक भाष्ये व चरित्रग्रंथ लिहिले. हे सर्व साहित्य चिकित्सापूर्वक अभ्यासल्यावर असे लक्षात येते की, शिवचरित्राची अजूनही खूपच मोठ्या प्रमाणावर साधने मिळविण्याची आवश्यकता आहे. शिवकालातील कितीतरी व्यक्तींची, स्थळांची, घटनांची व वस्तूंचीही साधार माहिती अत्यल्पच सापडलेली आहे. अशी मोलाची साधने सापडण्याची शक्यताही आहे. पाश्चात्त्य राष्ट्रांतील दफ्तरखाने अद्याप पाहिले गेलेले नाहीत. महाराष्ट्राबाहेरील अन्य भाषिक दफ्तरखाने व प्रत्यक्ष महाराष्ट्रातीलही विविध स्थळी असलेली कागदपत्रे, पोथ्या, कोरीव लेख आणि वस्तू अंधारातच आहेत. त्याकरिता प्रथम उजेडात यावयास हवेत ज्ञानी संशोधक. येथे फार मोठा दुष्काळ आहे ज्ञात्यांचा. असे संशोधक तयार करणे फारच कठीण काम आहे. अशा जाणत्या संशोधकांतील एक म्हणून डॉ. सदाशिवराव शिवदे यांचे नाव घ्यावे लागेल. त्यांनी मराठवाड्यातील मंजरथ या छोट्याशा गावातील दीक्षित घराण्याची पोथ्यापुराणे शोधिली. त्यातच त्यांना 'प्रतापदुर्गामाहात्म्यम्' नावाची हस्तलिखित पोथी मिळाली. ही पोथी, शके १६७१ आश्विन शुद्ध एकादशी म्हणजेच दि. १ ऑक्टोबर १७४९ या दिवशी लेखकाने लिहून पूर्ण केली आहे. लेखकाचे नाव रामचंद्र नृसिंह दीक्षित असे असून ही पोथी त्याने संस्कृत भाषेत श्लोकबद्ध रूपात लिहिली आहे. या लेखकाचा वाडा मंजरथ येथे पडीक स्वरूपात आज अस्तित्वात आहे. मंजरथ हे गाव बीड जिल्ह्यातील माजलगाव तालुक्यात आहे.

या पोथीच्या शोधकार्यात डॉ. शिवदे यांना त्यांचे एक मित्र श्री. भुजंग बोबडे यांनी साहाय्य केले आहे आणि पोथीचा मराठीत अनुवाद डॉ. स. मो. अयाचित यांनी केला आहे.

'प्रतापदुर्गामाहात्म्यम्' या पोथीचे लेखन रामचंद्र दीक्षित याने स्वतः केले आहे. स्वराज्यसंस्थापक छ. शिवाजी महाराजांचे नातू छ. शाहूराजे (छ. संभाजीराजांचे पुत्र) यांच्या समकालातच या कवी रामचंद्र दीक्षितांचा जीवनकाल

आहे. दि. १ ऑक्टोबर १७४९ हा या पोथीचा समाप्तीकाल आहे. म्हणजेच आद्य छत्रपती शिवाजी महाराज यांच्या मृत्यूनंतर एकोणसत्तर वर्षांनी ही पोथी लिहिली गेली आहे. म्हणजेच सूर्य मावळल्यानंतरच्या संधिप्रकाशात हा कवी रामचंद्र दीक्षित शिवकालातील चार घटना शिवाजी महाराजांच्या प्रत्यक्ष नातसुनेला सांगतोय. या नातसुनेचे नाव राणी सकवारबाईसाहेब. शाहू छत्रपतींच्या ह्या पत्नी. शिवकालाशी या कवीचे बरेच जवळचे नाते आहे. प्रतापगडावरील भवानी देवीचे माहात्म्य कवीने पौराणिक पद्धतीने लिहिले आहे. पण शिवकालीन इतिहासाच्या दृष्टीने त्याने लिहिलेल्या माहितीचे महत्त्व निश्चित मोठे आहे. शिवजन्माची तिथी व वर्ष जेधे शकावलीशी कवींद्र परमानंदाच्या अनुपुराण-शिवभारताशी पुरेपूर जुळते आहे. त्याचप्रमाणे अफजलखानवधाची तिथी या कवीने अशीच पूर्ण जुळणारी लिहिली आहे. त्याने लिहिलेल्या शिवकालीन घटनांचा तपशील अभ्यासकांनी आवर्जून अभ्यासावा असा आहे. श्रीसमर्थ रामदास स्वामी व छ. शिवाजी महाराज यांच्या संबंधातील या कवीने दिलेली माहिती इतिहासकारांना विचारात घ्यावीच लागेल. डॉ. शिवदे म्हणतात, 'उत्तरकालीन बखरींपेक्षा निश्चितपणे साधन म्हणून अधिक उपयुक्त ठरण्यास हरकत नाही,' असे हे प्रतापदुर्गामाहात्म्यम् हे साधन उपलब्ध झाले आहे. डॉ. शिवदे यांनी घातलेली ही संशोधित साधनाची भर मोलाची आहे. कणाकणाने विश्वसनीय माहिती मिळूनच आजपर्यंतचे उपलब्ध शिवचरित्र संशोधकांनी आपल्यापुढे ठेवले आहे.

'कालचे' शिवचरित्र साधार साधनाअभावी अपूर्ण आणि अशक्त होते. 'आजचे' शिवचरित्र हे साधार साधनांच्या उपलब्धीमुळे काहीसे बाळसेदार, सशक्त झाले आहे. नवीन साधनांची मंद गतीने का होईना; पण त्यात भर पडत आहे. नवीन संशोधकांची भर पडत गेली, तर 'उद्याचे' शिवचरित्र हे अधिक सुदृढ, अधिक बुद्धिप्रधान, प्रतिभासंपन्न, अस्सल नवरत्नांप्रमाणे तेजोमय असेच होईल. हे सर्व चरित्रलेखकांकरिता माझे विधान व निदान आहे. नव्या शिवचरित्र लेखकांची भांडवली योग्यता उत्तुंग असावयास हवी. राजस्थानातील बिकानेरच्या दफ्तरखान्यात, हॉलंडमधील हेग येथील दफ्तरात आणि खुद्द पुण्याच्या एलियानेशनमध्ये असलेल्या प्रचंड कागदपत्रांचे वाचन आणि चिंतन केले गेले, तर 'उद्याचे' शिवचरित्र लिहिणाऱ्या लेखण्या आपल्या बुद्धीने व प्रतिभेने जगातील इतिहासकारांना दिपवितील आणि सुखवितील.

संस्कृत भाषेत लिहिल्या गेलेल्या हस्तलिखित ग्रंथांचे संशोधन व नंतर विश्लेषण करण्याचे काम डॉ. सदाशिवराव शिवदे यांनी हाती घेतले असावे.



तसा सुगावा आमच्या कानी आला आहे. खरोखर हे कार्य मोलाचे आहे. डॉ. शिवदे यांना यशच लाभेल. महाराष्ट्रात व अन्यत्रही जुन्या शास्त्री, पंडितांच्या घराण्यात हस्तलिखित संस्कृत पोथ्यांचे भांडार आजही कोंडून पडले आहे. त्या भांडारांच्या धन्यांनी ते खोलावे. सरस्वतीवर उपकार होतील! आमचे तरुण मित्र श्री. उमेश सुभाष धालपे हे अशा दुर्मीळ ऐतिहासिक साधनांचे प्रकाशन करण्यास सिद्ध आहेत. प्रस्तुत 'प्रतापदुर्गामाहात्म्यम्' यांनीच प्रकाशित केले आहे. या उपक्रमामागे ग्रंथालये, विद्यापीठे आणि शासने समर्थपणे उभी राहतील, असा विश्वास वाटतो. डॉ. शिवदे, डॉ. अयाचित, श्री. बोबडे आणि त्यांचे सर्व साहाय्यक अभिनंदनास पात्र आहेत.

बहुत काय लिहिणे? राजते लेखनावधि ।।

—बाबासाहेब पुरंदरे

पुरंदरे वाडा, पुणे - ९

# मनोगत

मी 'मराठ्यांच्या इतिहासाची संस्कृत साधने' या विषयावरील प्रबंधाचा अभ्यास गेली तीन-साडेतीन वर्षे करीत होतो. हे काम करीत असताना मी जुन्या संस्कृत ग्रंथांच्या शोधात होतो. त्या अनुषंगाने माझे एक मित्र श्री. भुजंग बोबडे हे मराठवाड्यात तसेच तेलंगणात फिरून जुनी कागदपत्रे, पोथ्या, ग्रंथ मिळवीत असल्याचे मला समजले. त्यांना मी लिहीत असलेल्या प्रबंधाविषयी बोललो व आपणाकडून काही मदत व्हावी अशी अपेक्षा व्यक्त केली. त्यांनी ही गोष्ट लक्षात ठेवून पुण्यास येताना माझ्याकरिता ७-८ संस्कृत व मराठी पोथ्या आणल्या; व माझ्यापुढे ठेवल्या. दोन-चार दिवस मी ते ग्रंथ चाळीत होतो. एक दिवस मी माझे मित्र डॉ. रा. पां. गोस्वामी यांना बोलावले व त्यांनी आणि मी मिळून सर्व पोथ्या चाळण्यास सुरुवात केली. आमचे लक्ष 'प्रतापदुर्गामाहात्म्य' या पोथीकडे स्थिरावले. त्या पोथीची पाने आम्ही व्यवस्थित लावून घेतली आणि वाचण्यास सुरुवात केली. सुरुवातीस त्यात रामायणकथा असल्याचे दिसून आले. पुन्हा पाने व्यवस्थित वाचावयास सुरुवात केल्यावर शिवचरित्रातील महत्त्वाच्या घटना त्यात असल्याचे लक्षात आले. त्यामुळे एक घबाड सापडल्याचा आनंद मला झाला. मी पोथीचा शब्द न् शब्द वाचला व माझ्या पक्के लक्षात आले की, २६० वर्षांपूर्वीच्या शिवचरित्राच्या एका संस्कृत साधनाचा आपणास शोध लागला आहे.

**पोथीचे स्वरूप –**

ग्रंथाचा कागद जीर्ण झाला आहे, तरीपण अक्षरे सुस्पष्ट दिसत आहेत. पोथीचा आकार २१ x १५ सें.मी. असा आहे. प्रत्येक पानावर चौदा ओळींमध्ये श्लोक लिहिलेले आहेत. लिहिताना वेगवेगळे बोरू वापरलेले दिसतात. अक्षर मात्र एकाचेच (ग्रंथकर्त्याचे) असावे. प्रत्येक पानावर डावीकडील कोपऱ्यात प्रता.दु. व उजवीकडील कोपऱ्यात मा.अ. (माहात्म्य अध्याय) असे लिहून त्याच्यापुढे क्रमांक दिला आहे. अध्यायसंख्या एकूण १८ असून अध्यायसमाप्ती इतिश्री भविष्येखिले सह्याद्रिखंडे प्रतापदुर्गमाहात्म्ये... नाम ... अध्याय: ।क्रमांक ।। अशी तांबड्या शाईने केलेली आहे. ग्रंथसमाप्तीनंतर ग्रंथाचा विषय, त्यातील अभ्यास क्रमांक, अध्यायाचे नाव, अध्यायातील श्लोकसंख्या



कोष्टकरूपाने दिली आहे. त्याच्या खालीच कोष्टकामध्ये एकूण अध्याय १८, पत्रे (पाने) ५३, श्लोकसंख्या ६५० असे दिले आहे.

**लेखनकर्ता व लेखनकाल –**

पोथीच्या प्रथम पृष्ठावर ग्रंथकर्त्याने स्वतःच्या नावाचा, ग्रंथाच्या नावाचा व ज्या ठिकाणी ग्रंथ लिहिला त्या ठिकाणचा उल्लेख केला आहे.

इदं पुस्तकं प्रताप दुर्गामा
हात्म्यस्य सप्ताद्रौरामचं
द्रदीक्षितेन सदाव्रतिना
मंज्रथक्षेत्रस्थेनेलिखितं

याचा अर्थ मंजरथक्षेत्र निवासी रामचंद्र दीक्षित सदाव्रती याने प्रतापदुर्गामाहात्म्य हे पुस्तक सातारा (सप्ताद्रौ) येथे लिहिले.

ग्रंथाच्या शेवटच्या पृष्ठावर ग्रंथकर्त्याने पुस्तकाच्या लेखनाची तिथी व शक दिला आहे. कसे ते पाहा–

इदं प्रतापदुर्गामाहात्म्यस्य
पुस्तकं शके १६७१ शुक्ले आश्वि
न श्रुद्ध १ लिखितं रामचंद्र दीक्षि
।। त सदाव्रतिना ।।

याचा अर्थ असा की, हे पुस्तक रामचंद्र दीक्षिताने शके १६७१ आश्विन शुद्ध १ या दिवशी लिहून पूर्ण केले. (ऑक्टोबर १७४९) हा दिवस घटस्थापनेचा, नवरात्र प्रारंभ असा आहे.

ग्रंथकर्त्याने दहाव्या अध्यायात आपल्या घराण्याची हकिकत दिली आहे. गोदावरी व सिंधुफेणा नदीच्या संगमाच्या दक्षिण तीरावरील मंजरथ या (गोदावरी सिंधुफेना संगमे दक्षिणे तटे) क्षेत्रावर येथे मार्जारहत्या दोषनिवारण होते. तेथे वामन, मायगोस्वामिनीदेवी, वृषाकपि, महादेव, त्रिविक्रमविष्णूलक्ष्मी यांची मंदिरे आहेत. तेथे कण्व, अपस्तंभ, ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी या शाखेची ब्राह्मण घराणी आजही आहेत. उपाध्ये नावाचे ऋग्वेदी, काश्यप गोत्री पुरोहित नावाचे अपस्तंभ व सामवेदी शाखेच्या ब्राह्मणांचे पुरोहित म्हणून काम करणारे ग्रंथकर्त्याचे घराणे असल्याचा उल्लेख या ग्रंथात आहे. ग्रंथकर्त्याने पुढे आपली वंशावळ दिली आहे–

शंभूशर्मा–कपिल–रामचंद्र–महादेव–नृसिंह–रामचंद्र (ग्रंथकर्ता) तो आपल्या आईचे नाव लक्ष्मी असे देतो. आपण वेदवेत्ता, शास्त्रवेत्ता, चिकित्सज्ञ

व कवीश्वर असल्याचे लिहितो. आपण चांद्रायणी व्रताचे कर्ते व युक्तिविशारद आहोत, तसेच शाकाहारी, वाहारी, तिळाहारी, जवाचे पीठ खाऊन राहणारे व्रतस्थ आहोत. त्याचप्रमाणे काशी, रामेश्वर, गया ही क्षेत्रे व वैजनाथ हे क्षेत्र आपण पाहिले असून भागीरथी जल प्राशन केले आहे. आपल्या पत्नीचे नाव 'आंबा' असे असून ती पतिव्रता व उत्तम सुगरण आहे असे तिचे वर्णन करतो. बाळकृष्ण नावाचा मुलगा असून भवानी व मणिकणी अशा आपणास दोन कन्या आहेत, असे तो म्हणतो. कन्यागत पर्वाच्या निमित्ताने कृष्णास्नानासाठी आपण गेल्याचे तो म्हणतो. तो सपत्नीक अग्निहोत्र करीत असे. महाबळेश्वर येथे जाऊन प्रतापगडावरील दुर्गादेवीचे दर्शन घेऊन धोमतीर्थास गेलो, जरंडेश्वरावर मारुतीचे दर्शन घेतले, सातारच्या किल्ल्यावरील मंगळाईदेवीचे (सप्ताद्रिस्छांचमंगळा) दर्शन घेतले, यवतेश्वराचे दर्शन घेतले आणि पुन्हा कृष्णा-वेण्णा संगमावर गेलो. याप्रमाणे त्याने स्वत:ची माहिती देऊन आपण साताऱ्यास कन्यागतामुळे कृष्णास्नानास आलो हे स्पष्ट केले आहे.

त्यानंतर तो सातारा येथे राज्य करीत असलेल्या छ. शाहू महाराज यांच्या पत्नी महाराणी सकवारबाई यांना भेटला. त्यांनी त्याला आपल्या घराण्यातील पूर्वीच्या राजांसंबंधी माहिती सांगितली. त्यासंबंधी तो म्हणतो, महाराष्ट्रात सूर्यवंशीय मालोजीराजा होता. (माळवनृप) त्याचा मुलगा शहाजी, पुढे शहाजीचा मुलगा शिवाजीराजा झाला. त्याने रायगडावर राहून फार मोठे राज्य मिळविले. त्याचा मुलगा शंभूशर्मा (संभाजीराजा) व त्याचा पुत्र शिवाजी (शाहूराजा) यास ते शाहूराजा असे म्हणतात, असे तो सांगतो. मालोजीराजांची पत्नी उमाबाई, तर शहाजीराजांची पत्नी जिजाबाईपण कीर्तिमान होत्या, असे तो म्हणतो. शिवाजीराजांची पत्नी महाराणी सईबाई या प्रपवार कुळातील होत्या. त्या पुण्यशील व सत्वलक्षणमंडित होत्या. शंभूराजांच्या पत्नी राजसा सुविख्यात असल्याचे तो म्हणतो. शाहूराजांच्या पत्नी सुकुमारबाई (सकवारबाई) ह्या असून त्या देवदेवता, विप्र यांच्यावर भक्ती करणाऱ्या असून कीर्तन, पुराण श्रवण करणाऱ्या, व्रताचरण करणाऱ्या आहेत, असे तो सांगतो-

शाहूराज्ञोवरापत्नी सुकुमारानिगद्यते ।।३५।।
सार्तिभक्तिमतीविप्रेदेवेभर्त्तीरिकिर्त्तने ।
पुराण श्रवणे दाने काव्येतीर्थे व्रतेगवि ।।३६।।

त्यांची मी भेट घेतली व त्यांनी आपल्या संवादातून आपले वरील वंशकथन केले, असे तो म्हणतो.



रामचंद्र दीक्षिताच्या वरील निवेदनावरून तो शाहू महाराजांच्या कारकिर्दीत साताऱ्यास आलेला दिसतो. त्याने आपल्या ग्रंथाच्या शेवटी ग्रंथलेखनाची तारीख शके १६७१ आश्विन शुद्ध एकादशी (१ ऑक्टोबर १७४९) अशी दिली आहे. शाहू महाराज १७४९ मध्ये वारले. त्याच्याआधी काही महिन्यांपूर्वी तो महाराणी सकवारबाईंना भेटलेला दिसतो. शाहू महाराजांचे मार्गशीर्ष वद्य ३ शुक्रवार शुक्ल नाम संवत्सरे शके १६७१ (१५ डिसेंबर १७४९) रोजी महानिर्वाण झाले. त्याच्याआधी रामचंद्र दीक्षित साताऱ्यास आलेला दिसतो.

छ. शाहू महाराजांच्या पत्नी महाराणी सकवारबाई या त्यानंतर सती गेल्या. त्यांना 'थोरली धनीण' असे म्हणत. त्या शिर्के घराण्यातील होत्या. त्यांना एक कन्या झाली होती. तिचे नाव 'गजराबाई'. ती कदमबांडे घराण्यात दिली होती. छ. शाहू महाराजांची दुसरी पत्नी सगुणाबाई, यांना एक मुलगा झाला होता; पण तो तीन वर्षांचा असतानाच वारला. सगुणाबाई या मोहिते घराण्यातील होत्या. त्यांना एक मुलगीही होती. शाहू महाराजांची बिरूबाई नावाची रक्षा इ.स. १७४० मध्ये वारली. सगुणाबाई आणि सकवारबाई यांच्यात अतिशय संघर्ष होता. सकवारबाई या अतिशय महत्त्वाकांक्षी होत्या २५ ऑगस्ट १७४८ रोजी सगुणाबाईंचे निधन झाले. त्यामुळे शाहूराजे अत्यंत दु:खी झाले . महालातील कटकटींपासून मुक्त व्हावे म्हणून ते सातारच्या बाहेर नदीच्या काठी तृणघर बांधून राहू लागले. त्याला 'वनवासवाडी' हे नाव मिळाले...

पुन्हा साताऱ्यास राहावयास जावयाचे नाही, श्रीकृष्णातीरीच वास करावयाचा म्हणून सातारा व माहुली यांचे दरम्यान छपरबंदी करून राहू लागले, त्यास वनवासवाडी म्हणत.

**अंतरंग -**

पहिल्या अध्यायात आपण रामचंद्र दीक्षित कृष्णास्नानार्थ आल्याचे लिहितो. त्याचा व सुकुमारबाईंचा संवाद त्याने यात दिला आहे. रामचंद्र दीक्षितांना प्रतापगडावरील भवानीदेवीचे माहात्म्य आम्ही तुमच्या मुखातून ऐकू इच्छितो, अशी इच्छा सकवारबाईंनी प्रगट केली-

सुकुमारोवाच ।।
तस्यादेव्याश्वमाहात्म्यं श्रोतुमिछामित्वन्मुखात् ।।
प्रतापदुर्गसंस्छा यामहिमानंवदस्वमां ।।२७।।
इतराज्ञीवच:श्क्रत्वारामचंद्रः सदाव्रती ।।

सकवारबाई त्यांना म्हणाल्या की, माझ्या पतीचे आजोबा शिवाजी यांना

प्रतापदुर्गेचा वर प्राप्त झाला होता. त्याने आपल्या प्रतापाने मोठमोठ्या यवन राजांचा पराभव केला. त्या राजांच्या राज्यांच्या सीमा त्याने पादाक्रांत केल्या. त्यानी भरपूर ऐश्वर्य प्राप्त केले. ज्या दुर्गादेवीची त्यांच्यावर कृपा होती, त्या दुर्गादेवीचे माहात्म्य तुमच्या मुखातून ऐकण्याची आमची इच्छा आहे. त्या दुर्गादेवीचा महिमा तुम्ही आम्हाला सांगा. यावर दीक्षित म्हणाले, 'मी प्रतापदुर्गामाहात्म्य आपणास ऐकवितो.' येथे पहिला अध्याय समाप्त होतो.

कृष्णा आणि वेण्णा या नद्यांच्या उत्पत्तीसंबंधीचे वर्णन करणारा हा दुसरा अध्याय आहे. यात प्रतापगड ज्या डोंगरावर आहे त्या डोंगरास ढोळपाळा असे म्हटले आहे, तसेच पार या गावचा उल्लेख आहे. अशा ठिकाणी प्रतापदुर्ग छत्रपतींनी निर्माण केला.

सह्याद्रेः शिखरेस्छितात्रविमळेश्रीढोळपाळाव्हेदुष्टध्वंसकरी प्रतापकरिणी–पाराख्यसत्यत्तने ।।१ ।।

अशा प्रतापदुर्गेचे माहात्म्य मला राणीने सांगावयास लावले. त्यामुळे मी आणि माझे समस्त कुळ धन्य झाले असे ग्रंथकर्ता म्हणतो–

राज्ञ्याज्ञा पितएवसादरमहंमाहात्म्यसर्वणने धन्योसम्पघकुळंममात्र विमळं धन्यम् भवेद्भूतळे ।।२ ।।

कृष्णा आणि वेण्णा या दोन्ही नद्या साक्षात महादेवाच्या कन्या आहेत. त्यांचा संगम सातार्‍याजवळ झाला आहे, हे लिहिताना ग्रंथकार यवतेश्वर, पाटेश्वर, मेरूलिंग, सातारच्या किल्ल्यावरील मंगळाईदेवी यांचाही उल्लेख करतो.

तिसऱ्या अध्यायात एकूण ४४ श्लोक असून रामायणकथेस प्रारंभ केला असून रामाच्या वनवासगमनाचे वर्णन ग्रंथकाराने केले आहे.

चौथ्या अध्यायात रामाने वालीचा वध कसा केला याचे रोचक वर्णन ३८व्या श्लोकात ग्रंथकर्त्याने केले आहे.

पाचव्या अध्यायात हनुमंतास देवीकडून मिळालेले वरदान हा विषय रंगविताना ग्रंथकर्त्याने ३५ श्लोकांमध्ये नेमक्या शब्दात रामायण कथन केले आहे.

तसेच ४३ श्लोकांच्या सहाव्या अध्यायात इंद्रदोषकथा वर्णिली असून परस्त्रीगमनाचा दोष हा प्रतापदुर्गेला पुनःपुन्हा नमन केल्यास नाहीसा होतो, असे म्हटले आहे. या अध्यायात प्रतापदुर्गेचे सुंदर वर्णन केले आहे. पुढील सातवा अध्याय हा ४१ श्लोकांचा बळी व दुर्गा युद्धवर्णनाचा अध्याय आहे. आठवा अध्याय इंद्राचा विजय झाल्याचे वर्णनाचा आहे. नवव्या अध्यायात प्रतापवीर्य



नावाच्या कामांध राक्षसाने दुर्गादेवीशी युद्ध केले. त्यात त्याचा पराभव होऊन देवीने त्याचा वध केला, त्यामुळे देवीला 'प्रतापदुर्गा' तसेच त्या स्थळाला 'प्रतापदुर्ग' असे नाव पडले. जरंडाख्यानम् नावाच्या दहाव्या अध्यायात सकवारबाईंनी दीक्षितांना सांगितले की, कृष्णा-वेण्णा संगमाच्या परिसरात असलेल्या जरंडा या ठिकाणाचे महत्त्व काय आहे हे आम्हाला सांगा.

सुकुमारोवाच । श्रृणुदीक्षितमद्वाक्यंजरंडात्रत्वयापुरा ।।<br>
कृष्णावेण्योः संगमेयः प्रोक्तः प्रोत्तुंगपर्वतः ।।१ ।।<br>
कुतः केनसमानीतः कदाकोमहिमास्यहि ।।<br>
तत्सर्वंविस्तरेणाद्यकथयस्वममाग्रतः ।।२ ।।

त्यावर दीक्षितांनी रामायणातील लक्ष्मणमूर्च्छा प्रसंग सांगितला असून द्रोणागिरी पर्वतावरून संजीवनी आणण्यासाठी हनुमानाने द्रोणागिरी पर्वत उचलून आणला. तो आणताना त्याचा काही भाग वाटेत पडला, त्यास 'जरंडा' असे म्हणतात. पुढे हनुमानाने सूक्ष्मरूपाने तेथे तपःश्चरण केले. तो द्रोणागिरीचाच एक खंड असल्यामुळे तेथे नाना धातू व दिव्य सुगंधित वनस्पती आहेत, सुवर्ण निर्माण करण्याची क्षमता असलेली ही भूमी आहे–

जरंडाख्यंमहछृंगंद्रोणाद्रेः खंडमुत्तमं ।।<br>
दिव्यवल्ली समाकीर्णं नाना धातुसुमंडितं ।।१४।।<br>
यत्रवल्ली सुगंधावग्रहणान्टगदक्षयः ।।<br>
भवत्येवाचिराद्दैवंफळितंसुकृतेनचेत् ।।१५।।<br>
कळौवल्ल्योजनैः सर्वैर्नज्ञायंतेकदापिताः ।।<br>
दैवात्सुकृतिभिर्लभ्याः सुवर्णकरणक्षमाः ।।१६।।

**रामदासांचे वर्णन –**

कलियुगात मानवांच्या उद्धारासाठी वायुपुत्राचा अवतार झाला. रामदास हा विप्र कुळात एक ज्ञानी जन्माला आला. तो ज्ञानसंपन्न, गुणसंपन्न असून श्रीरामोपासक असून श्रेष्ठ असा निर्भर होता. जांब गावात जन्माला आलेला तो चाफळवासी झाला. तो तांबूस हुर्मुजी वर्णाचे कपडे घालणारा कवी, दासबोधादी उत्तम ग्रंथाचा निर्माता, शिष्यांना उपदेश करणारा, शुक्ल (कोरड्या) भीक्षेवर निर्वाह करणारा व नेहमी देव-ब्राह्मणांविषयी आदर-भक्ती बाळगणारा ज्ञात्यांत श्रेष्ठ असा असून तो 'महापुरुष' या नावाने ओळखला जातो.

**अकरा मारुती –**

ग्रंथकर्ता म्हणतो, रामदासांनी अकरा महारुद्रांची स्थापना केली. त्याची

नावे पुढीलप्रमाणे- सिंगणवाडी, चाफळ येथे दोन, माजगाव, उंब्रज, शहापूर, मसूर, बहे, पार, शिराळे, महाबळ (मनपाडळे). रामदासांनी परळी दुर्गावर आपली अवतारसमाप्ती केली.

**शिवाजी महाराज व रामदास संबंध –**

रामदासांनी चाफळ येथे राम, लक्ष्मण, सीतेच्या मूर्तींची स्थापना केली. त्या मूर्तींच्या दर्शनाने पातके नाहीशी होतात. महाराणी सकवारबाईंना ग्रंथकर्ता सांगतो की, तुमच्या पतीच्या आजोबांना (शिवाजी महाराजांना) रामदासांनी राममंत्रोपदेश दिला. शिवाजी महाराज त्यानुसार आपले आचरण ठेवीत असत. त्यांच्या मंत्रसामर्थ्यामुळे तसेच सद्गुरूंच्या कृपेमुळे त्याने यवनराजांचा पराभव करून पराक्रम केला. राणीसाहेब याप्रमाणे मी आपल्या प्रश्नांची उत्तरे दिली आहेत. त्यातीलच हे जरंडा शृंगाचे माहात्म्य श्लोकांतून तो देत आहे –

राममंत्रोपदेशंयस्तव भर्त्तुःपितामहं ।।
शिवभूपंचकारात्र निजवाक्यानुवर्त्तिनं ।।२९।।
यस्यमंत्रस्य सामर्थ्या त्सग्दुरोः कृपयापिच ।।
प्रतापंप्रकरोद्भूम्यां जित्वा यावन पार्थिवान् ।।३०।।
एवं मम यथाराज्ञित्वयापुष्टं मयोदितं ।।
जरंडाश्रृंगमाहात्म्यं रामदास कथादिकं ।।३१।।

छत्रपती शिवाजी महाराज व रामदास यांचे संबंध वरील श्लोकांतून आपल्याला समजतात. ही गोष्ट ऐतिहासिक साधन म्हणून महत्त्वाची आहे. रामदासांचे वर्णन ग्रंथकर्ता महाराजांच्या नातसुनेला ऐकवितो, ही गोष्ट महत्त्वाची वाटते.

११ व १२ या अध्यायांची पृष्ठ क्रमांक ३२ब, ३३, ३४, ३५ व ३६अ ही पाने मिळाली नाहीत. या दोन अध्यायांत देवीकवच व अष्टोत्तर नामस्तोत्र हे दोन विषय असल्याचे पोथीच्या शेवटी दिलेल्या कोष्टकावरून लक्षात येते. ऐतिहासिक साधन म्हणून त्याचा फारसा उपयोग असेल असे वाटत नाही.

पुढील तेराव्या अध्यायातील पहिले पान मिळाले नसल्यामुळे त्यातील पहिले पाच श्लोक उपलब्ध नाहीत. पुढील उर्वरित श्लोकांत त्याने आपल्या वंशाची, गावाची माहिती दिली आहे. ती यापूर्वी लेखनकर्ता व लेखनकाल यामध्ये दिली आहे. चौदाव्या अध्यायात प्रतापदुर्गेच्या वरामुळे शहाजीराजांना प्रतापवान व बुद्धिवान जणू शिवाचा अंश असा 'शिवाजी' नावाचा पुत्र झाला. तो मालोजीराजांचा नातू व शाहूराजांचा आजोबा. तो शालिवाहन शके १५५१



शुक्ल नाम संवत्सरात उत्तरायणात फाल्गुन शु. तृतीया शुभलग्नावर पाच ग्रह अनुकूल उच्चीचे असताना शिवनेरी किल्ल्यावर जन्मास आला.

शाकेश्रीशालिवाहेत्रंभूबाणशरभूमिते १५५१ शुक्ल संवत्सरे पुण्ये शैशिरेचोत्तरायणे ।।
फाल्गुणस्यासितेपक्षे तृतीयां सुलग्नके ।।४।।
निशायामति श्रुद्धायांप्रोच्चस्थेग्रहपंचके ।।
शिवनर गिरावेवर्यस्यजन्मबभूवतत् ।।५।।

वरील शिवजन्मतिथी ही परमानंदकृत शिवभारत व जेधे शकावली यांच्याशी पूर्णपणे जुळणारी आहे. यात ग्रंथकाराने विशेष म्हणजे शक हा अंकामध्ये दिला आहे, जी शिवभारत व जेधे शकावलीशी जुळणारी आहे.

यापुढे तुळजाभवानीचा आशीर्वाद छत्रपती शिवाजी महाराजांस लाभला असल्याचे त्याने म्हटले आहे. तू अबाजीद्वारा गंडकी नदीतून मोठी शिळा आणून मला सह्याद्रीच्या शिखरावर उत्सव करून अष्टभुजा अशी माझी सुंदर मूर्ती स्थापित कर, असे देवी महाराजास सांगते. त्याप्रमाणे शिवाजी महाराजांनी गंडकीची शिळा यत्नपूर्वक आणून सुंदर मूर्ती करविली व तिची प्रतापगडावर उत्सवपूर्वक स्थापना केली, मोठे मंदिर उभे केले. तिच्या प्रसादाने स्वबळावर शिवाजीराजांनी पृथ्वी वश केली व तो दख्खनचा राजा झाला. त्याने स्वतःची मुद्रा निर्माण केली व स्वतःच्या सिंहासनावर विराजमान झाले व छत्र धारण केले. त्याचे केवळ नाव ऐकूनच अन्य राजे मनातून भयभीत होत असत. यवन राजांवर विजय मिळवून त्याने भीमेच्या तीरापर्यंत राज्यविस्तार केला. यापुढे शिवाजीने केलेल्या पराक्रमाचे वर्णन ग्रंथकर्ता करतो. तसेच पुढे औरंगजेबाबद्दल तो लिहितो की, तो जणू राक्षसाचा अंशच ! परंतु स्वतःचा धर्म मात्र निष्ठेने पाळतो. तो ठरलेल्या तिन्ही वेळी ईश्वरप्रार्थना (नमाज) करतो. तो जितेंद्रिय असून बुद्धिमान, चतुर, तपस्वी वृत्तीचा, मिताहारी असून गंगाजल प्राशन करीत असे. तसेच तो स्वतःचे धर्मशास्त्र (कुराण) जाणणारा व व्रताचरण करणारा होता. यवनेतर जातींचा तो द्वेष्टा, विशेषतः देव, मंदिरे, तीर्थस्थळे तसेच ब्राह्मण यांचा द्वेष्टा होता. तो क्रूर असा आहे. यापुढे तो लिहितो की, ताम्रानन (मोगल), सुंता केलेले सर्व लोक सर्व जातीच्या सुंदर स्त्रियांना जबरदस्तीने आपल्या शयनमंदिरात नेत असत. जिकडे तिकडे अस्थिर परिस्थिती झाली. यासाठीच शिवाने अंशावतार धारण केला, व यापुढेही याचे वंशज शंभूराजा व शाहूराजा हे काम करतील असा संवाद भवानी आणि शिव यांच्यात ग्रंथकर्त्याने या अध्यायात घातला आहे.

पुढील १५ व १६ या दोन अध्यायांत अफजलखानाचे आगमन व वध याचे सविस्तर वर्णन ग्रंथकाराने दिले आहे. आदिलशहाने शिवाजीचा नाश करण्यासाठी अफजलखान नावाच्या वजिरामधील मुख्याला वरून तह करण्यासाठी व आतून घात करण्यासाठी भरपूर सेनासामग्रीसह पाठविले. पुढे ग्रंथकर्त्याने जावळीच्या जंगलाचे वर्णन केले आहे. तेथे गुप्तरूपाने त्याने आपले सैन्य ठेवले. त्यानंतर दूतांची ये-जा झाली. शिवाजीराजांनी देवीची पूजा करून ते तेथेच देवीच्या मंदिरात झोपले. भवानीदेवीने शिवाजीच्या डोक्याजवळ एक कवच (शिरस्त्राण) व तेजस्वी छोटी तलवार झटकन ठेवली व शिवाजीच्या स्वप्नात येऊन म्हणाली, 'राजा, तो दुष्ट जरी कपट मनी धारण करून आला असला, तरी तू काळजी करू नकोस. त्याच्यावर विश्वास ठेवू नकोस. तो घात करण्यासाठी आला आहे. मी दिलेले जे असित (शस्त्र) आहे, त्यात मी प्रवेश करीन. त्याने आपल्या अंगरख्यामध्ये पोटावरती तीक्ष्ण असे स्पय (खंजीर) तुला मारण्यासाठी ठेवले आहे. ते तू लक्षात ठेवून तुझ्या अंगरख्याच्या बाहीत मी दिलेले असित ठेव. तसेच मी दिलेले अभेद्य असे कवच (चिलखत) तू धारण कर. त्या जंगलात ठिकठिकाणी तुझी सेना पसरून ठेव. याचे सविस्तर वर्णन पोथीत आहे... औरंगजेब हा यावनी राजा दुष्ट बुद्धीचा असल्यामुळे विप्रादि सर्व जातींचा उत्कर्ष त्याला सहन होत नाही. सर्वांचे रक्षण करण्यास सिद्ध झालेल्या पराक्रमी शिवाजीराजांनाही रात्रंदिवस ही गोष्ट कष्टप्रद वाटत होती.

विजयी शिवाजीराजे रायगडावर राहिले. दोनशे बावन्न विविध शृंगांचे (उंचीचे) किल्ले त्यांनी बनविले होते. आपले संरक्षण करण्यासाठी सह्याद्रीवर यवनेश अवरंगजेबाने एकेक उंच किल्ला प्रयत्नपूर्वक व बुद्धी चालवून बऱ्याच काळानंतर भेद उपायाने व सैन्याच्या जोरावर आपल्या ताब्यात घेतला. त्याच्याच संमतीने विजापूरचा आदिलशहा देखील यवनांचा शत्रू असलेल्या शिवाजीराजांना सहन होत नव्हता. कपटाने तो शिवाजीराजांना मारावयास उद्युक्त झाला. तह करण्यासाठी दुष्ट बुद्धीने त्याने आपल्या बलाढ्य मंत्र्यास सैन्य देऊन विराट भागाकडे, डावपेच जाणणाऱ्याकडे पाठविले. त्या वेळी सर्व बाजूंनी मोठमोठ्या वृक्षांनी कृष्णातीर झाकला गेला होता. लांडगे, वाघ, डुकरे इत्यादी नाना प्रकारच्या शेकडो (जंगली) श्वापदांनी तो वेढला गेला होता, काटेरी झाडांनी भरला होता. त्यात दिव्य वेलींची वनेही होती. सूर्यप्रकाश नव्हता. असलाच तर काही ठिकाणी दिसे. नद्या आणि तलाव होते. चारी बाजूंनी श्वापदे धावत असत. त्या ठिकाणी अफजलखानाच्या सैन्याने तळ दिला. त्याच्याजवळच जावळीचे खोरे होते. त्यात



झाडांच्या मधूनच त्याची सेना गुप्तपणे बसली होती. त्याचे दूत सतत शिवाजीनृपांकडे जात-येत होते. शिवाजीराजांना त्याच्या मनातील छद्म लक्षात आले होते.

पुढच्या १६व्या अध्यायात लेखकाने अफजलखानाची हकीकत लिहिली आहे. लेखक म्हणतो की, अफजलखानाने निमंत्रण दिल्यावर गिरिजेच्या आशीर्वादाने राजा विराट जंगलाकडे सैन्यासह लगेच निघाला. जंगलात मधूनमधून सैन्य लपविल्यामुळे अफजलखानाची भेट घेण्यासाठी न घाबरता तो गेला. तो आल्याचे ऐकून पराक्रमी अफजलदेखील आपले सैन्य जंगलात शक्यतो आपल्याजवळ ठेवून दोन-तीन सेवकांना बरोबर घेऊन शिवाजीराजांच्या भेटीच्या उत्सुकतेने निघाला. आपल्या सामर्थ्यावर पूर्ण विश्वास असलेले शिवाजीराजेसुद्धा दोन-तीन सेवकांना बरोबर घेऊन निघाले. निबिड अरण्यात त्यांची भेट झाली. गर्विष्ठ अफजलखान मस्तक थोडेसे लवलेल्या शिवाजीराजांना त्यांची थोडी मनात भीती असतानाही मधुर बोलून प्रसन्न करण्यासाठी म्हणाला, "मल्लाप्रमाणे पुष्ट शरीर असलेल्या माझ्यापुढे तू धैर्याने, गर्वाने तुझे मस्तक मुळीच न वाकविता धारिष्ट्याने कसा थाटात उभा आहेस?" त्याचे हे शब्द ऐकताच शिवांशापासून जन्मलेले शिवाजीराजे अफजलखानाला आपल्या वाणीने प्रसन्न करीत म्हणाले, "इतरत्र मी स्वतःच्या बळावर सर्वांची मस्तके नमविली आहेत आणि यापुढे अशीच माझी इच्छा आहे. मग मी आपले मस्तक तुझ्यापुढे कसे नमवू?"

*सर्वेषां मस्तकान्यत्रस्वबळान्नम्रितान्यहं ।।*
*कर्तुकामः कथं कुर्यांस्वशिरोनम्रितंत्विद ।।१।।*

त्यांचे अभिमानयुक्त धैर्याचे वाक्य ऐकून तात्काळ आपले बाहू पसरून अफजल त्यांना आलिंगन देण्यासाठी जवळ आला. त्याबरोबर शिवाजीराजांनीही आपले बाहू पसरले व त्याच्या पुढे आले. पर्वतासारख्या धिप्पाड अशा त्याचा स्पर्श झाला त्या वेळी त्वरित त्या दुष्ट अफजलखानाने पोटाच्या वरच्या बाजूस अंगरख्यातून अतिशय धारदार बिचवा काढून त्यांच्या पाठीत खुपसणार इतक्यात चपळाईने शिवाजीराजांनी कवचात लपविलेले (कवचगोपि) आपले शस्त्र काढून त्याचा प्रयत्न निष्फळ केला. नंतर त्यांनी चपळाईने आपल्या हाताच्या बाहीतून (असित) छोटी तलवार (कट्यार) बाहेर काढली आणि त्वरित शत्रूच्या पोटात बलपूर्वक खुपसून त्याचे आतडे पोटातून बाहेर काढले.

*स्वरिपोः कुक्षिदेशे तुरोपयित्वाबळेनहि ।।*
*तदंत्रजाळं जठराब्दहिर्निष्कारयत्क्षणात् ।।१७।।*

तेव्हा तो अफजल जावळी खोऱ्यातील जमिनीवर सर्व पृथ्वीला जणू गरगर फिरवीत पर्वताप्रमाणे खाली पडला. दैत्याच्या अंशापासून उत्पन्न झालेला तो महादुष्ट यवन 'अफजल' शिवाजीराजांकडून ठार झाला.

शके १५५१ विकारी संवत्सरात मार्गशीर्ष शुक्ल पक्षात गुरुवारी सप्तमीला माध्यान्ही जावळीच्या खोऱ्यात भवानीदेवीने दिलेल्या तलवारीने शिवाजीराजांकडून अफजल मारला गेला.

*भूम्यष्टशरभूम्यंकैर्मिते १५८१ श्री शालिवाहजे ।।*
*शाके विकारी वर्षेत्रमार्गशीर्ष सिते गुरौ ।।२०।।*
*सप्तम्यांचैवमाध्यान्हे देशे जावल कोरजे ।।*
*दुर्गादत्ताऽसितेनैव शिवेनाफजलोहत: ।।२१।।*

शिवाजीराजांनी हर्षाने टाळी वाजविली. त्याच्या बाजूला असलेल्यांनीही त्याप्रमाणे टाळ्या वाजविल्या. या खुणेवरून आनंदित होऊन जंगलात लपलेल्या शेकडो शिवानुयायांनीही टाळ्या वाजविल्या. या खुणेवरून आनंदित होऊन शिवाजीराजांचा जय झाल्याचे समजून तेथे अत्यंत पराक्रमाच्या टाळ्या ऐकू येऊ लागल्या. शिवाजीराजांनी अगोदरच टाळ्यांसंबंधी सूचना दिल्या होत्या. त्यामुळे सर्वजण त्याकडे कान लावून बसले होते. शिवाजीराजांभोवती सगळे जमा झाले व नगारे वाजविले. त्या वेळी अफजलच्या सेनेला सूचना मिळाली व ती शिवाजीराजांकडे धावली.

बाणांचा आणि शस्त्रांचा त्या दुष्टांनी वर्षाव केला, तरी शिवपराक्रमाच्या उग्र दावानलात ते भाजून निघालेच. त्या सर्वांची शरीरे छिन्नविछिन्न झाली आणि ते मेले. उरलेले पळून गेले. आदिलशहाकडे गेले. आदिलशहाला सर्व सविस्तर वृत्तांत समजल्यावर ती वार्ता दूतांकरवी त्याने औरंगजेबापर्यंत पोहोचविली.

अफजल मेल्याचे त्यांच्याकडून समजल्यावर औरंगजेबाचे मुख काळवंडले. 'हाय! हाय!' अशी वाक्ये म्हणत पुन:पुन्हा छाती बडवीत उग्र अशा त्यास शिवप्रताप म्हणजे अपकर्ष वाटला.

शिवाजीराजेसुद्धा विजय मिळाल्यावर नगाऱ्यांच्या महानादाने, शूरांच्या स्तुतीने, विद्वानांच्या आशीर्वादाने, हळूहळू प्रतापदुर्गा देवीकडे जाऊन पुन:पुन्हा नमस्कार व स्तवन करीत राहिले. तिचा प्रसाद पुन्हा प्राप्त करून स्वस्थलाकडे गेले.

अशा रीतीने प्रतापदुर्गेच्या प्रतापामुळे शिवाजीराजांना यवनाधिपतींवर विजय मिळत गेला व सर्व आनंदित झाले.



या अध्यायात ग्रंथकर्ता सकवारबाईंना म्हणतो की, तुमचे दर्शन होण्यापूर्वी मी यात्राप्रसंगाने प्रतापगिरीवर गेलो. तेथील प्रतापदुर्गेची स्तुती तुम्ही ऐकू इच्छिता, ती मी वर्णन करतो. त्याप्रमाणे प्रतापदुर्गेची स्तुती वर्णन करणारे ३३ श्लोक ग्रंथकर्त्याने लिहिले आहेत. त्यात तो म्हणतो की, मी हे माहात्म्य वर्णन करताना शिवाजी आणि अफजलखान युद्धप्रसंगाचे व औरंगजेबाच्या राजवृत्तीचे वर्णन केले आहे.

१८व्या शेवटच्या अध्यायात देवीच्या अनुष्ठानाचे विविध प्रकार दिले आहेत.

**ऐतिहासिक साधन म्हणून महत्त्व –**

हा ग्रंथ २६० वर्षांपूर्वीचा असल्याने तो शिवकालास अतिशय जवळचा आहे. छत्रपती शिवाजी महाराजांचे महानिर्वाण १६८० मधे झाले. त्यानंतर छत्रपती संभाजी महाराज हे गादीवर आले. १६८९ मधे संभाजीराजांचे हौतात्म्य झाले. त्यांचा पुत्र शाहू हा औरंगजेबाच्या कैदेत दाखल झाला. औरंगजेबाचा मृत्यू १७०७ मधे झाला व त्यानंतर १७०८ मधे शाहूराजांची सुटका झाली व ते साताराला आले व राज्य करू लागले. त्यांच्या कारकिर्दीच्या अखेरीस रामचंद्र दीक्षित साताऱ्यास आला. त्याने शाहूराजांच्या पत्नी सकवारबाई यांची भेट घेतली व त्यांच्या सांगण्यावरून 'प्रतापदुर्गामाहात्म्य' हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथात अनेक ऐतिहासिक घटनांचे उल्लेख त्यांच्या साक्षीने त्याने नमूद केले असल्यामुळे ऐतिहासिक साधन म्हणून या ग्रंथाचे मोल विशेष आहे. खालीलप्रमाणे ऐतिहासिक घटना त्यांनी नमूद केल्या आहेत–

**छत्रपती शिवाजी महाराज –**

१) छत्रपती शिवाजी महाराजांचा जन्म फाल्गुन वद्य तृतीया शके १५५१ला शिवनेरीवर झाला. ही तिथी त्याने श्लोकबद्ध केली असून अंकामधेपण दिली आहे. कवींद्र परमानंदांच्या शिवभारतात तिथी श्लोकबद्ध केली आहे; पण अंकांमधे दिलेली नाही. जेधे शकावलीत पण हीच तिथी नमूद केली आहे. यापूर्वीच्या पुराव्यास वरील प्रत्यंतर पुरावा मिळतो.

२) छत्रपती शिवाजी महाराजांनी प्रतापगडावर भवानीदेवीचे मंदिर बांधले. देवीची मूर्ती गंडकीतून शिळा आणून करविली. तेथे उत्सवपूर्वक तिची स्थापना केली. पूर्वीच्या संशोधनास हाही एक प्रत्यंतर पुरावा मिळतो.

३) या ग्रंथात ग्रंथकर्त्याने मालोजीराजांची पत्नी उमाबाई, शहाजीराजांची पत्नी कीर्तिमान जिजाबाई, शिवाजीराजांच्या पत्नी पवार कुलोत्पन्न सुशील सईबाई,

संभाजीराजांच्या पत्नी सुविख्यात राजसाबाई, शाहूराजांच्या पत्नी सुकुमारबाई (सकवारबाई) ह्या असून त्या देवदेवता, विप्र यांच्यावर भक्ती करणाऱ्या असून कीर्तन-पुराण श्रवण करणाऱ्या व्रताचरण करणाऱ्या आहेत असे म्हटले आहे.

४) शिवाजी महाराजांनी अनेक यवन पार्थिवांना स्वबळावर जिंकले. रायगडावर छत्रसिंहासन निर्माण केले. त्यांचे नाव ऐकताच यवनराजांना कापरे भरत असे.

५) शिवाजी महाराजांनी दुष्टांचा संहार व सज्जनांचा प्रतिपाळ केला, धर्माचे पुनरुज्जीवन केले.

६) शिवाजी महाराजांनी २५२ किल्ले घेतले.

**औरंगजेब –**

१) औरंगजेब हा स्वधर्माने पालन काटेकोरपणे करतो; परंतु दुसऱ्या धर्मीयांचा द्वेष करणारा, मंदिरे-तीर्थस्थाने पाडणारा, क्रूर असा होता.

२) त्याच्या राज्यात स्त्रियांच्यावर अत्याचार झाले, प्रजा गांजली गेली.

३) औरंगजेबाने नंतर शिवाजी महाराजांचे अनेक किल्ले जिंकून घेतले.

**अफजलखान –**

१) ग्रंथलेखकाने अफजल आगमन व अफजल वध अशा दोन अध्यायांतून स्वराज्यावरील अफजलखानाच्या स्वारीचा नेमका वृत्तांत कथन केला आहे. त्यातील खालील गोष्टींचे उल्लेख ऐतिहासिक साधन म्हणून महत्त्वाचे वाटतात –

१.१) अफजलखानाने विजापूरहून कपट मनात बाळगून सह्याद्रीच्या दुष्कर अशा गर्द झाडीने वेढलेल्या आणि हिंस्र श्वापदांची वस्ती असलेल्या जावळी खोऱ्यात येण्याचे ठरविले व त्याने आपले सैन्य बिकट वाटेतून तेथे नेले. त्याची व शिवाजी महाराजांची भेट झाली. अफजलखानाने प्रथम बिचव्याचा वार शिवाजी महाराजांच्या पाठीत केला. महाराजांनी चपळाईने आपल्या लपविलेल्या छोट्या तलवारीने अफजलखानाच्या पोटात वार करून त्याची आतडी बाहेर काढली.

१.२) वरील घटनेची अचूक तिथी ग्रंथकर्त्याने दिली आहे– मार्गशीर्ष शु. सप्तमी विकारी नाम संवत्सरे शके १५९१ गुरुवार माध्यान्ह समयी. ही तिथी इतर साधनांशी अचूक जुळणारी आहे.

१.३) अफजलखानाच्या वधाचे काम फत्ते झाल्याचे टाळी वाजवून महाराजांनी सुचविले. तशा टाळ्या इतरांनी वाजविल्या. त्या टाळ्यांमुळे नंतर नौबती वाजविण्यात आल्या. टाळ्यांचा संकेत हा महाराजांनी अगोदरच ठरविला होता. ही नवीन माहिती ग्रंथकर्ता देतो.



**रामदास व इतर –**

लेखकाने सकवारबाईंच्या सांगण्यावरून जरंडेश्वराचे माहात्म्य सांगितले, त्यात तो खालील उल्लेख करतो–

१) यवतेश्वर, पाटेश्वर, मेरुलिंग, जरंडेश्वर, धोमतीर्थ, वाईतीर्थ व अकरामारुती.

२) परळीच्या किल्ल्यावर रामदासांचे निधन झाले.

३) रामदासांनी दासबोध ग्रंथ लिहून शिष्यांना उपदेश केला.

४) रामदासांनी छत्रपती शिवाजी महाराजांना राममंत्रोपदेश केला.

५) शिवभूपती हे स्वतःच्या बोलण्याप्रमाणे वागत असत.

हे साधन बखरपूर्व काळातील असल्यामुळे त्याचे मोल निश्चितच मोठे आहे. छ. शिवाजी महाराज व रामदास यांचे संबंध स्पष्ट करण्यास हे साधन महत्त्वाचे आहे.

**काव्य या दृष्टीने मूल्यमापन –**

ग्रंथकाराची भाषा अत्यंत साधी, सुबोध आणि सरळ अशी आहे. सर्व अध्याय एकाच म्हणजे अनुष्टुभ छंदात असून अलंकारादी गोष्टींचा ग्रंथकाराने कोठेही वापर केलेला नाही. तरीसुद्धा रामकथा लिहिताना लेखकाच्या लेखणीतून उतरलेले माधुर्य वाचकांना विशेष जाणवते. अफजलखान वधाची हकीकत सहज आणि सोप्या शब्दांत लिहून शिवछत्रपतींच्या महाप्रतापाची गाथा साध्या, सोप्या आणि सरळ भाषेत ग्रंथकर्ता सांगतो.

कवीन्द्र परमानन्द किंवा जयराम पिण्ड्ये यांच्यासारखा हा कवी प्रतिभासंपन्न नाही; पण त्याच्या काव्यातील सुबोधता मात्र प्रशंसनीय वाटते.

वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार केला असता काव्य या दृष्टीने या ग्रंथाचा दर्जा निकृष्ट आहे, हे डॉ. अयाचितांचे मत पूर्णपणे योग्यच आहे. तरीसुद्धा ऐतिहासिक साधन म्हणून याचा विचार केला असता छ. शिवाजी महाराजांच्या नातसूनबाई सकवारबाई यांच्याबरोबर ग्रंथकर्त्याचा संवाद होऊन या ग्रंथाचे त्यांच्यासमोरच वाचन झाले असल्यामुळे त्यातील घटनांची सत्यता निर्विवाद वाटते. ग्रंथकर्त्याने अवास्तव व काही लिहिले असते, तर सकवारबाई राणीसाहेबांनी त्यास निश्चितपणे विरोध केला असता. अफजलखान भेटीचा प्रसंग त्यातील कवीन्द्र परमानन्दांच्या शिवभारतातील घटनाप्रसंगाची तिथी तसेच छ. शिवाजी महाराजांची जन्मतिथी या गोष्टी तंतोतंत जुळणाऱ्या आहेत. याशिवाय औरंगजेबासंबंधी माहिती इतर ऐतिहासिक साधनांशी जुळणारी आहे. छ. शिवाजी

महाराजांना रामदासांनी मंत्रोपदेश दिला ही गोष्ट त्याने नमूद केल्यामुळे छ. शिवाजी महाराज व रामदास यांच्या संबंधाबाबत एक नवीन पुरावा या ग्रंथाद्वारे उपलब्ध झाला आहे.

ग्रंथकर्ता हा त्यावेळच्या महाराष्ट्राबाहेरचा असल्यामुळे व तो रामदासी पंथाचाही नसल्यामुळे त्याने केलेले लेखन हे कोणताही पक्षपाती दृष्टिकोन ठेवून केलेले नाही. या साधनाची तारीख ही साधारणपणे सप्टेंबर, ऑक्टोबर १७४९ ही आहे, म्हणजे शिवाजी महाराजांच्या महानिर्वाणानंतर ६९ वर्षांनी लिहिलेला हा ग्रंथ आहे. त्यामुळे तो उत्तरकालीन बखरींपेक्षा निश्चितपणे साधन म्हणून अधिक उपयुक्त ठरण्यास हरकत नाही.

या ग्रंथाची शुद्ध प्रत व अनुवाद डॉ. स. मो. अयाचित यांनी अतिशय मेहनतीने व तन्मयतेने करून दिला. ग्रंथाची काव्य या दृष्टीने सखोल चिकित्सा केली व ग्रंथसंपादनाच्या कामी मदत केली, याबद्दल त्यांचे ऋण सदैव माझ्या माथी राहील. या कामी मला श्री. रमण चितळे, डॉ. रा. पां. गोस्वामी, डॉ. श्रीपाद भट, श्री. नंदू लांडगे, श्री. महेंद्र देव, श्री. बोबडे तसेच माझी लेखनिक सौ. मैथिली पिंपळे यांचे साहाय्य झाले, त्यांचे आभार.

या ग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी विश्वामित्र प्रकाशनचे श्री. उमेश ढालपे यांनी स्वीकारली व पूर्ण केली, त्याबद्दल त्यांचेही आभार. आदरणीय श्रीमंत बाबासाहेब पुरंदरे यांनी प्रस्तावना लिहून या कार्यास आशीर्वाद दिले ही बहुमानाची गोष्ट घडली, त्यांचे आभार शब्दात मानणे शक्य नाही.

भारत इतिहास संशोधक मंडळाने या ग्रंथावर शोधनिबंध सादर करण्यास परवानगी दिली व तो त्रैमासिकात प्रकाशितही केला, याबद्दल डॉ. सौ. शोभना गोखले व सचिव डॉ. श्री. म. भावे यांचे आभार मानतो.

पुणे डॉ. सदाशिव शिवदे



# काव्य या दृष्टीने मूल्यमापन

रामचंद्र दीक्षित सदाव्रती यांनी शाहूपत्नी सकवारबाई यांना त्यांच्याच विनंतीवरून प्रतापदुर्गा देवीचे माहात्म्य अठरा अध्यायांत ६५२ श्लोकांच्या माध्यमातून वर्णन करून सांगितले. दुसऱ्या अध्यायात कृष्णा आणि वेण्णा या नद्यांची पौराणिक उत्पत्तिकथा सांगितली आहे. त्यानंतर तीन ते पाच अध्यायांत रामाची वनवासयात्रा व हनुमानाची भेट वर्णिली आहे. सहा ते आठ अध्यायांत इंद्राचा अपराध, बलि व दुर्गा यांचे युद्ध, आणि शेवटी इंद्राला क्षमापन असा विषय आहे. नवव्यात प्रतापवीर्य राक्षसाचा वध व त्याला वर म्हणून दुर्गेने स्वतःला प्रतापदुर्गा म्हणवून घेतले. दहाव्या अध्यायात जरंडाख्यान म्हणजे पुनः हनुमानाचाच पृथ्वीवरील रुद्रावतार येतो. अकरा व बारा या दोन अध्यायांत कवच आणि अष्टोत्तर नामस्तोत्र असल्याचा ग्रंथसमाप्तीनंतर उल्लेख असला, तरी हे दोन अध्याय मांत्रथ येथे उपलब्ध झालेल्या प्रतीत नाहीत. तेराव्यात भोसले वंशाची कथा सांगितल्यावर, चौदा ते सोळा या तीन अध्यायांत शिवाजीराजांचा औरंगजेबाशी लढा व नंतर अफजलखानाचा वध सविस्तर वर्णिला आहे. सतराव्या अध्यायात रामचंद्र दुर्गेची स्तुती करतात व अखेरीस अठराव्या अध्यायात आपल्या ग्रंथाचे महत्त्व अनुष्ठान प्रकारांच्या द्वारा वाढवून सांगतात. या संक्षेपावरून असे म्हणता येईल की, आपल्या ऐतिहासिक कथनाला ग्रंथकाराने पौराणिक कथांची पुष्टी देऊन तो भविष्यपुराणाच्या परिशिष्ट रूपातील सह्याद्रिखंडात असल्याचे ठोकून दिले आहे. अशाप्रकारचे अनेक माहात्म्य ग्रंथ स्कंद व पद्मपुराणात असल्याचे ते ते ग्रंथाकार सांगतात.

ग्रंथकार व्युत्पन्न असला तरी उपलब्ध पोथीत व्याकरणाच्या अनेक चुका आढळून येतात. त्यांची येथे थोडक्यात नोंद करूया.

(०) जयदा नृपान् (१/११), लोकान् (१५/३७), त्वां प्रसन्नास्मि (४/६), (५/५), त्वां तुष्टास्मि (१७/१३), तवोदितं (४/३४), तव वदामि (७/१७), स्मरणं ते जनाहिह (९/३३); मां प्रेषितो; कृष्णां स्नातुं (१३/२६); सर्वं मामस्ति देवितः (१७/२१); तुभ्यं कथं मतिः (१७/२३), समासरचनाही बरोबर नाही, ब्रह्माविष्णु (२/२९), त्वत्साकं (४/७), किंशक्ति (४/९), निजसत्करे

(७/१३), किंचित्सैन्ययुत(९/९), तीव्रसदैव भक्त्या (१४/१०), मृगतुल्यचंचलां (१७/५), रोगिनीरोगमोचने (१७/१६), केशरीस्कंध (७/२३), इत्यादी. पूर्वकालवाचकांची रूपेही व्याकरणदुष्ट आहेत.; उदाहरणार्थ पूज्य (२/३५), गोप्य (१५/२०), स्थाप्य (१६/३), निवेदितुं (१७/२२), वर्णितुं (१७/२३), क्षमितुं (१७/३१); हतवती याऐवजी हतवान् (९/१७) असे चुकीचे रूप वापरले आहे. प्रतापदुर्गामिति मे यन्नाम (५/१०), प्रतापदुर्गामिति च नाम्ना (६/३७) या ठिकाणी द्वितीया विभक्तीचा प्रयोग नको; तसेच प्रतापवीर्यत्त्विति ते यन्नाम (९/३२) या ठिकाणी 'तु' अव्ययाची आवश्यकता नाही, कदाचित् उच्चारण सौकर्यार्थ ते घातले असावे ३/४० व १४/१६ येथे बरोबर आहे. प्रक्षिपत् (९/१५), प्रकरोत् (१०/३०, १४/१५, १५/५) याठिकाणी 'प्र'च्या ऐवजी 'प्रा' केले म्हणजे भूतकाळीचे रूप ठीक होते. रोपयत् (१६/१४) याही ठिकाणी अरोपयत् असे हवे. पण या सर्व ठिकाणी छंदोभंग टाळण्याकरिताच ही रूपे वापरलेली आहेत हे उघड दिसते. अयाचत् (३/३९) याही ठिकाणी त्याच कारणाने परस्मैपद वापरलेले आहे. राज्याय (निमुज्यमानः ३/३७) येथील चतुर्थी विभक्ती संशयास्पद वाटते. स्पर्धिता **, स्पर्शितं (९/२०) याठिकाणी भूतकालवाचके नामावरून बेतलेली वाटतात. प्रक्षिपिष्यति (१३/२०) याऐवजी प्रक्षेप्स्यति असे अपेक्षित आहे, परंतु इडागम अगदीच त्याज्य म्हणणे कठीण वाटते, त्याचे कारण लौकिक/पौराणिक शैलीत त्याने सुटसुटीतपणा आला आहे असे कोणी म्हणू शकेल. सप्तैकेण (४/२६) याठिकाणी णत्वांचा संभवच नाही. आलिंगयंतं (१५/२४) याऐवजी (पुनः वृत्तसौकर्यार्थ?) आलिंगयतं असे केले आहे. मद्दत्तासिमध्ये (१५/१९) या कशाबशा जुळविलेल्या समासात 'मध्ये'च्या अगोदर एक 'त' केवळ वृत्तासाठी आला आहे. स्वकरकंचुके (१५/२०) हाही समास संतोषकारक नाही. (मानामानौ/सुखं-दुःखं/ लाभालाभौ, जयाजयौ) भवत्येव (६/२९) येथे उघडच कर्तृद्वित्व आणि क्रियैक्य जुळत नाही, त्यासाठी कर्तृद्वित्व वस्तुतः कर्त्रैक्यच आहे असे म्हणावे लागते, व हे स्पष्टीकरण चालू शकेल. अष्टाविंश याऐवजी अष्टविंशत्सुवर्णेन (१८/१८) असे आणखी काही श्लेष काढता येतील. केतक्युदरपांडुभ्यां (गंडाभ्यां ६/७) हा प्रयोगही चुकीचा नसला तरी विचित्रच वाटतो. मर्दयामास (तोरणं ५/१७), ग्रहणं समुपागमत् (?५/१९), तन्मनाः संबभूव (७/१) हेही प्रयोगही चमत्कारिक प्रकारातच बसतात. (शिवः) शाहूनामापरं भवेत् (१३/३२), पतिव्रतादिनारीणां (३/५) हे समास



म्हणजे स्वच्छंद लेखनाचे विलक्षण नमुनेच होत. छत्रं निजोर्ध्वं धृतवान् नृपेंद्रः (१४/२०) यातील आशय लक्षात येतो, परंतु रचना समाधानकारक नाही. स्यातं मखं पूर्णं गायत्र्या चाकरोद् विधिः (=विधिम् २/३६) हीही रचना तशीच गोंधळात टाकणारी आहे. दुर्गान्तर (७/२), म्हणजे किल्ल्याची आतली बाजू हा प्रयोग ठीक आहे. यथा कामात् (९/२३) म्हणजे आपल्या कामेच्छेने, यथा भगात् (१३/२२) म्हणजे आपल्या नशिबाप्रमाणे, (समर्चयामास) यथा भगेन (१४/१६) म्हणजे आपल्या वैभवाप्रमाणे, निजभगेनैव (१४/७) म्हणजे आपल्या आवडीप्रमाणे. भग या शब्दाचे याठिकाणी दिलेले अर्थ मोनियर विल्यम्सने नोंदलेले आहेत. चंडिकास्त्रं (६/६, ८) म्हणजे चंडिकेने फेकलेले अस्त्र (सुगंधाचे) 'अवग्रहण' (१०/१५) हा शब्द प्रचाराबाहेरचा दिसतो. नास्माभिर्गमनं पृष्ठे तवाग्रे क्रियतेधुना (७/१७) हाही प्रयोग प्रयोगानभिज्ञतेचाच वाटतो. अविलंब इत्यादी विशेष उठावदार करण्यासाठी जवात् (४/३७, ७/९, १४/८), क्षणात् (६/३, १०/९), जवेन् (५/५, १५/२४) वेगतः (७/१४), ( वादयामासुर) आदरात् (मन लावून?, १६/२२), (विप्रादिभ्यः करं दूतैः ग्राहयामास) सादरम् (हट्टाने, किंवा प्रयत्नपूर्वक (१४/३०), (कथयस्व) ममाग्रतः (१०/२, मराठी प्रयोग?), तीव्रसदैवभक्त्या (१४/१० तीव्र आणि सदैव?) असे प्रयोग ग्रंथकाराचा भोंगळपणा मात्र व्यक्त करतात. देविजं (कवच, १८/२६), विप्रादिसर्व जातीनां (१४/३२) सर्वजातिस्थम् (उत्कर्षं न सहिष्यति, १५/१), एवं प्रकारयेत् (१८/२३) येथेही लेखनात शैथिल्य दिसते. हंसो गृह्णति तत्क्षीरं यथा त्यजति तज्जळं (१७/३०), हे अनेन कार्यसिद्धिः स्याद् यां यामिछति मानवः (१८/१०), तसेच (१८/२०,२३) याठिकाणीही शैथिल्याचा परमोत्कर्ष झाला आहे. तसेच दुर्गा म्हणून कथा सुरू केल्यावर तिलाच मधून पार्वती, गिरिजा, भवानी इत्यादी नावांनी निर्देशिणे हा गलथानपणाच आहे. वृक्षतळाधतः (१५/२२) हा असाच मारून-मुटकून बनविलेला शब्द आहे. शरासन म्हणजे 'बाण फेकणे'; परंतु ग्रंथकार 'शराशन' (४/२ शरासन) म्हणजे धनुष्यबाण असे समजतात, असा त्यांच्या 'जग्राह ऐंद्र शरासन' या वाक्यावरून ग्रह होतो. 'कवचं त्वप्यभेदकं (१५/१६) याठिकाणी तु या अव्ययाचा लोपच अपेक्षित आहे. अतिपुण्यतमं श्रेष्ठ/परमं महत् (१८/२) येथे तर या दुर्गामाहात्म्याला most supremest करून टाकले आहे.

नृणां (३/१९,२०), सपत्निक (१३/२७), क्चा (६/१८), द्विजादिनां

(१४/२९,४०), आशिभिः (१६/३२), कुमारितः (१६/३२), पौरोहितः (१३/ ११) अशा काही स्थली वृत्त सौकर्यार्थ ऱ्हस्व-दीर्घाकडे लक्ष दिले नाही. तसेच ते लिपिकाच्या अज्ञानामुळेही झालेले आहे. परंतु नृणां असे योग्य रूपही तो वापरतो (२/४१), बहुनां (३/२२), तत्सहायं (७/८), दशे (देशे, १६/१८), (रामेश्वर, रामाश्वर १३/१८), ममुच (मुमोच), दुर्गभां (दुर्गमां, ६/४०), यवनाग्रण्यान् (यवनाग्रगण्यान्, १६/३४) ही लिपिक झोपलेला असण्याचीच उदाहरणे आहेत. कृतम् अत्र तु (हेळनं) याठिकाणी (२/२६) तु ऐवजी नु जास्त योग्य व अपेक्षित आहे, कदाचित् तसा तो मूळ प्रतीत असेलही. काही ठिकाणी पाठ बरोबर आहे (किंवा होता) का असाही संशय येतो; उदा. देवाचार्यं देवाचार्थं (६/१८) मानवैः/मानवः (८/२१), इवं (राष्ट्रं) (४/१९) याऐवजी इदं हवे. स्थापयामासुः सर्वत्र (१४/३३) यामुळे छंदाचे एक अक्षर जास्त झाले आहे. विशेषतः चौदा ते अठरा या अध्यायांत छंदोभंग खटकतो.

लिपिकाची लेखनवैशिष्ट्येदेखील नोंद करण्यासारखी आहेत. लेखनसरणी एकदा लक्षात आली म्हणजे गबाळेपणाने लिहिलेल्या शब्दांवरून शुद्ध रूप लक्षात येणे सोपे जाते. या दृष्टीने प्रत्येक हस्तलिखिताचे संपादन करणाऱ्याने या लेखनवैशिष्ट्यांची दखल घेणे आवश्यक आहे. त्यावरून आणखीही महत्त्वाच्या दुव्यांचा शोध लागू शकतो. चिरकालं (१/२२), मनोभिलसितं (१/२२), ब्रह्मं छूतं मया (१/२४), रूषि (१/२४), यत्प्रतापाछिवेन (१/२५), कुळदेवीं (१/ २६), भक्तांन्समागत्त्य (२/४३), स्छिता (२/४३), दाशरथी (३/२४), कैकयी (३/२६), (कैकेय्याः २/२९), क्रीयते (३/४०), ऋषयोभ्यागमंन्सर्वे (४/४), प्रतिसुश्राव (४/४), सूर्पणखी (४/६), (सूर्पणखा ४/७), निहतांन्यासंन् (४/ ९), उत्स्मइत्वा (४/२५), ताळान् (४/२६), प्रस्छाप यामास (४/३१), अन्यछृणुष्वे (५/८), अतःत्स्वं (५/१२), समासाद्य (=समासाद्य ५/१६), पाळितां (५/१६), समुत्छाप्य (५/३०), माहात्मानं (५/२२), न्यकृतो (६/ ६), माहाकायः (७/३२), माहास्त्रं (८/६), माहावीरैः (८/९), माहाक्रूरे (१४/ २८), तारा (ताराः, ७/२८), परस्वधैः (७/३१), भिंडिमाळै (= ७/३१), तर्ही (७/३६), प्रगटीभूता (७,२,१५,२७,३७), उधत (=उद्यत ९/९), मयोझ्झितं (९/२०), भारतखंडे (१३/५), जरंडास्छं (१३/२८), रुग्वेदी (१३,१२), दुर्गयेत्छं (१४/१४), उछेंद (कृतवान् १४/२८), धरिणी (१४/ ३४), (आ)स्वासिताः (१४/४४, १५/३३), जावळकोरेति (१५/१२),



मस्तकस्या (?१५/१५), जावल कोरजे (१६/१८,२९), वृक्षछेदो (१५/३२), मुत्का (१५/३४), शीक्षितं (१५/३८), संन्निधं (१६/५), सिवाजी (१/३७), (शिवाजीराजा १४/१), सुश्रुवः (१६/२४), धाष्र्ण्य (६/२१), धार्ष्णेन (१६/ ७), धाष्र्ण्यं (१६/१०), माध्यान्हे (१६/२९), छंदशास्त्रे (१६/२९), कौसल्य (१७/१७), प्रवक्षामि (१८/१), त्रिषष्ठि (१८/१३,१४), अष्टविंशत्सुवर्णेन (१८/१८) इत्यादी. प्रत्येक शब्द लेखक/ लिपिकार एकाच प्रकारे लिहितो असे नाही. सिवाजी (१४/३७) याबरोबरच शिवाजी (१४/२३, १६/४) असाही प्रयोग येतो, व हा प्रकार सामान्य लेखनातही दिसतो. फक्त लिहिणाऱ्याचा नेहमीचा व सवयीचा कल कसा बनला आहे हे जसे त्यावरून समजते, त्याप्रमाणेच ज्या मूळ प्रतीवरून त्याने लेखन केले असेल त्या प्रतीचाही अंदाज येतो. अर्थात् अशी उदाहरणे सविस्तर नोंदण्याची आवश्यकता नाही.

या प्रतीवरून हे मूल लेखन नव्हे हे स्पष्ट दिसते. सामासिक शुद्धीकरणही मधून-मधून लक्ष वेधण्याइतके आहे, व ते स्वतः लिपिकाराचेच अक्षर आहे. मूळ लेखनविषयी काही अंदाज व काही संशय नोंद करण्यासारखे दिसतात. पारप्रदेश वहिनी निम्नगा (३/१३) हा मूळ पाठ असावा, तो छंदानुवर्तीही आहे. रम्यमाणाः (३/३५) असेच असावे, रममाणा हा शुद्ध प्रयोग असला तरी छंदाला कमी पडतो, आणि रम्यमावसथं ही श्लोकाची सुरुवातही रम्यमाणाः यालाच अनुकूल व प्रवाही वाटते. तेथेच संकाशा यापुढचा विसर्ग चुकून गळला की उच्चारणाच्या ओघात गाळला? दिदिक्षुर्जनकात्मजां (४/३१) यातील दिदिक्षु हे रूप दिशः प्रस्थापयामास याअगोदरच्या निर्देशामुळे 'दिशा (ठावठिकाणा) शोधू इच्छिणारा' असा ग्रह होऊ शकतो; पण असे रूप प्रमाणित नसल्यामुळे दिदृक्षुः याचाच तो भ्रष्ट अवतार आहे. सर्वदैवतेः आणि (५/२८) यापैकी अगोदरचा पाठ कोणता असावा? अर्थात् शुद्धाशुद्धाचा विचार न करता पंचसेनाग्रगान् हत्वा सप्तमं त्रिसुतानपि शूरमक्षं विनिष्पिष्य हत्वा नं जंबुमालिनम् (५/१८) याचा अर्थ स्पष्ट लक्षात येत नाही. हाच प्रकार गोदानाभिविराजिते, गोदावरी सिंधु फेनासंगमे (१६/६) याही ठिकाणी आहे. ककुद्मिनी गंगा (२/३१) याचाही अर्थ स्पष्ट नाही. शालिवाहने या स्थानी शालिवाहजे (१६/२०) आले आहे, यावरून आधारभूत प्रतीत लेखकाला 'न' व 'ज' यात संभ्रम निर्माण होण्यासारखे लेखन असावे काय? उत्तुंगपीनस्तन- भारमालिनी (१७/८) हेही मूल लेखकाचेच असावे का? श्रीशंकरप्राणविलासकारिर्णीं आर्द्रहृदमध्यस्थम् अन्नम् (१४/२९) हे

समासही पाहा.

वर आपण ग्रंथकार म्हणून दीक्षितांचे लेखन व्युत्पत्तीच्या दृष्टीने कसे हिणकस ठरते ते पाहिले. याखेरीज दीक्षित ऐतिहासिक जबाबदार ग्रंथकार म्हणून कसे वाटतात त्याचाही विचार करू. 'नानपद्मपुराणादि-कार्तिकाख्यान संग्रहात्। प्रतापदुर्गामाहात्म्यं त्वां वदाम्यद्य विस्तरात् ॥' (१/३१) असे म्हटले असल्यामुळे त्यांनी प्रतापदुर्गेच्या आख्यानासाठी पुराणांचा आधार घेतला आहे हे स्पष्ट आहे. असे असताना समाप्ती मात्र 'इति श्रीभविष्ये खिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये' अशी आहे. भविष्यपुराणात स्कंद आणि पद्मपुराणांप्रमाणेच मागाहून योजनापूर्वक घुसडलेले अनेक भाग आहेत हे सर्वमान्य आहे. 'कोण्या एका वर्षी' (कस्मिंश्चिद् वत्सरे, १३/२६) कृष्णा नदीवर दीक्षित स्नानाला गेले, व त्यावेळी (महाबळेश्वर?), हरिहरेश्वर, धौमतीर्थ, जरंडेश्वर, साताऱ्यातील मंगलादेवी, यवंतेश इत्यादी स्थानांना भेटी दिल्या (१३/२६-२९). गोदा-वेण्णा नद्यांच्या संगमाच्या दक्षिण तटावरील 'मंजंथ' या मार्जारस्पर्शदोषघ्न क्षेत्राचे ठिकाणी त्रिविक्रम हा क्षेत्राधिपती असून त्याच्या पाठीशी मायगोस्वामिनी देवी आहे, वृषाकपि महादेव या संगमावर आहे, व इतरही मंदिरे आहेत अशी माहिती दिली आहे (१३/६-९). त्या ठिकाणच्या उपाध्या-उपनामक कुलाची माहिती सांगितली आहे. शंभुशर्मा, आपस्तंब आणि सामवेदी ब्राह्मणांचे पुरोहित असले तरी, काश्यपगोत्री ऋग्वेदी ब्राह्मण होते. त्यांचा पुत्र कपिल, त्याचा पुत्र रामचंद्र, त्याचा पुत्र महादेव, त्याचा पुत्र नृसिंह, अशी कुलपरंपरा नोंदविल्यानंतर दीक्षित स्वतःविषयी म्हणतात की रामचंद्र नृसिंह आणि लक्ष्मी यांचा पुत्र आहे. त्यानंतर स्वतःबद्दल बरेच स्तुतिपर लिहिले आहे. (१३/१५-२२) त्यांनी काशी-रामेश्वराची यात्रा केली होती. अग्निहोत्र तर होतेच, त्याशिवाय अनेक व्रतेही केली होती. नंतर आपल्या अंबा नावाच्या भार्येबद्दल स्तुतिपर वर्णन आहे (१३/२३-२४). बाळकृष्ण आणि भवानी व मणिकर्णिका या दोन कन्यांचाही निर्देश केला आहे (१३/२५). पत्नीबरोबरच त्यांनी हरिहरेश्वरादी यात्रा केल्या व अशाच एका प्रसंगी सकवारबाईंनी त्यांची भेट घेऊन प्रतापदुर्गेचे माहात्म्य आणि आपली कुलकथा त्यांना विचारली. मालव-नृपति (मालोजीराजे), शहाजीराजे नंतर शिवाजीराजे (रायगडाहून राज्य करणारे), शंभुशर्मा (संभाजी), व नंतर पुनः शिव (शाहू). मालोजीराजांची पत्नी उमा, शहाजीराजांची पत्नी 'जिजू', शिवाजीराजांची पत्नी पवार घराण्यातील (नाव स्पष्ट होत नाही), संभाजीराजांची पत्नी राजसबाई, आणि शाहूराजांची



पत्नी सुकुमारा अशी ही कुलनामावली त्यांनी सुकुमारेलाच सांगितली (१३/३०-३५). समोर बसलेल्या सकवारबाईचेच स्तुतिपर वर्णन त्रयस्थ म्हणून येते! (१३/३६-३७). अशी ही समोरच्या व त्या अगोदरच्या एक-दोन पिढ्यांची हकिकत भविष्यकथनाच्या रूपाने भविष्यपुराणातील खिल पर्वात आल्याचे ग्रंथकार सांगतात! ही हकिकत समकालीन व्यक्तीबरोबर संवादरूपाने आली आहे, व समकालीन किंवा दोन पिढ्यांनंतरचा इतिहास म्हणून अफजलखानवधाच्या रूपाने येते.

अकरा-बारा हे दोन अध्याय या प्रतीत नाहीत. दहाव्याची पुष्पिकाही त्रुटित रूपात आहे व तेराव्या अध्यायाचे पहिले पाच श्लोक नाहीत. यावरून या प्रतीच्या मूळ आदर्शातही ते नसावेत. ३७ व ५१ या पृष्ठांवरही लेखन संदिग्ध आहे. सतराव्या अध्यायात 'मी आणखीही तू विचारशील ते सांगीन' (१७/३३) असे सांगितल्यावर अध्याय समाप्ती केली आहे, व अठराव्या अध्यायाचा प्रारंभ 'मी आता फलश्रुती सांगतो' असा आहे. रामदास स्वामींबद्दल लिहिण्यास आरंभ करताना 'जांबलेखकवंशीय' (१०/२१) असा एक अर्थस्पष्ट निर्देश आहे. त्याचा अर्थ जांबच्या कुलकर्णी यांच्या वंशातला असा आपल्याला माहीत आहे; परंतु तेथेच 'चाफलग्रामवासकृत' आणि हुरमुजी रंगाची वस्त्रे धारण करणारा हे नंतरच्या काळातले उल्लेख आहेत. अकरा मारुतींचाही सविस्तर निर्देश आहे (१०/२४-२८), व नंतर लगेच समर्थांनी शिवाजीला राममंत्राचा उपदेश दिला व आपल्या उपदेशाप्रमाणे वागण्यास अनुकूल करून घेतले (१०/२९) असेही सांगितले आहे. रामदासांसंबंधीचा हा सर्वच भाग (१०/१८-३१) नीट तपासण्यासारखा आहे. वृक्षखंड असा शब्दप्रयोग जंगलासाठी केलेला आहे. सप्ताद्रि शब्द (१/२०) पठारावरील साताऱ्यासंबंधी योजलेला आहे, विराट विषय (१५/८) प्रवर्षण-गिरी (५/१४), क(न)केश्वर इत्यादी भौगोलिक विषयही समजून घेण्यासारखा आहे. यवंतेश आणि साताऱ्याची मंगलादेवी यांतील अंतर पाच कोस असल्याचे विशिष्ट निर्देश आहे (२/६). जरंड क्षेत्रातील सुगंधी वल्ली आणि विशेष 'पुण्यवानांनाच लाभणारे' (परिस) (१०/१६) यांचा अद्भुत निर्देश त्याने मुद्दाम केला आहे. ऋषींसाठी योजिलेले अग्निकल्प (४/५) हे विशेषण ग्रंथकाराची व्युत्पत्ती आणि वैचक्षण्य दाखवितात. दुसऱ्या अध्यायातील ब्रह्मदेवांच्या दोन पत्न्यांची (स्वरा आणि गायत्री यांची) स्वभाववैशिष्ट्ये ठळक केली आहेत. गायत्री किंवा सरस्वती अशी ब्रह्मदेवाच्या पत्नींची नावे आहेत. स्वरा हे नाव,

सरस्वतीसाठी वापरले नसल्यास, त्याचा पौराणिक आधार शोधावा लागेल. स्वरा ही ज्येष्ठ पत्नी असल्याचा उल्लेख आहे (२/११), व तिचा तोरा आणि भांडण ठसक्यात वर्णिले आहे. बिडालास्त्र (८/२) आणि ओत्वस्त्र (८/१) अशी नवीन (?) अस्त्रे ग्रंथकाराने विनोदासाठी तर आणली नसावीत? एकीकडे प्रौढ भाषाज्ञान व्यक्त करणारा हा ग्रंथकार रोगैकशमनः, व्रीहिपुंजकाः (१८/३२), शकुनोयं परीक्ष्यताम् (१८/३२), असे संशयोत्पादक प्रयोगही सहजपणे करून जातो. 'यस्य प्रसादात् संबन्धा नृणां नश्यन्ति निश्चयात् (३/१९) म्हणजे काय समजायचे? 'कवरेणातिगर्वितः' (९/८) म्हणजे ब्रह्मदेवाच्या वराने माजलेला असा अर्थ थोड्या वेळानेच डोक्यात शिरतो. शबरीला उद्देशून श्रामणी (४/१७) हे विशेषण वापरले आहे. पुत्रपौत्री रमाकीर्तीः (१७/२१) या विचित्र समासातील 'रमा म्हणजे लक्ष्मी की भार्या? गोदावरीसिंधुफेनासंगमे (१६/६) यातील फेना म्हणजे वेण्णा समजले तरी सिंधु म्हणजे नदी असे अभिप्रेत दिसते. (चरिष्यत) यथा भगात् (१३/२२) म्हणजे 'तपाचरण वगैरे आपापल्या भाग्यात असेल त्याप्रमाणे' करा असा अर्थ असल्यास धर्मोपदेशपर व्याख्यानाची कमालच म्हणायची.

ग्रंथकाराने आणखी एक अनौचित्य केलेले आहे. समोर बसलेल्या राणी सकवारबाई यांना उद्देशून बोलताना शाहुमनोरमे (३/२१), सुकुमारांगि (६/१), शाहू प्राणप्रिये अनघे (१४/१, १७/१) अशी संबोधने वापरली आहेत. असा हा पढीक विद्वान अनौचित्य, भाषेतील भोंगळपणा, चुकीचे वाक्यप्रयोग भरपूर प्रमाणात तर करतोच; परंतु आपला हा माहात्म्य ग्रंथ म्हणजे एक अपूर्व प्रतिभेचे फळ आहे असे समजत आहे. शिवाजीराजांना प्रतापदुर्गा देवीने स्वप्नात दृष्टांत दिल्यानंतर स्वतःलाही दुर्गाष्टक (१७/३-११) रचल्यानंतर अकुंठित काव्यशक्ती आणि प्रतिदिन सहस्रब्राह्मणभोजन करविण्याची शक्ती , आणि अनेक शास्त्रांचे ज्ञान व तपाचरणशक्ती (१७/१२-१८) देवीने प्रसन्न होऊन दिली असे तो म्हणतो. आपले हे साधषट्शतश्लोकात्मक व अष्टादशाध्यायात्मक माहात्म्य हे (सप्तशतीप्रमाणे?) मंत्रात्मक आहे (१८/३५) अशी त्याची भावना आहे. असू द्या, आपण त्याची श्रद्धा दुखवू नये. परंतु या स्वस्तुतीबरोबरच तो प्रमाणाबाहेर व मर्यादा सोडून म्हणतो, 'अपशब्दाः शंतं माघे, किराते तु शतत्रयंम्। रघुवंशे न गण्यन्ते तत्र का गणनास्य सा ।।' (१७/२६) मी काही उदरभरणार्थ लिहिले नाही (१७/२७), म्हणून 'मयि दोषांवरोपोऽत्रं न कार्यंः पण्डितादिभिः' (१७/२५) अशीही तो शेखी मिरवितो, आणि तीही भविष्यपुराणातील परिशिष्टात आलेल्या



(घुसलेल्या) लेखनामुळे! इतका अभिमान असल्यावर समोर बसलेल्या भाविक श्रोत्याला तो या माहात्म्याचा पारायण प्रकार पेटिका-सूत्र रूपाने सात आवृत्या करून पस्तीस दिवस देवीकवचासह करायला सांगतो यात काहीच नवल नाही.

इतके सर्व विरोधी लिहिले तरी या ग्रंथाचा आंशिक रूपात का होईना एक गुण सांगणे आवश्यक आहे. मुख्यतः रामायणाचे तीन अध्याय (३-५) आणि आख्यानाचा इतर पुष्कळसा भाग त्याने अत्यंत सोप्या संस्कृतात प्रवाही रूपात सादर केला आहे, त्याविषयी त्याला चांगले मार्क्स द्यायला हवेत, तसेच ऐतिहासिक कथानकाच्या अफजलखानवधाच्या यथातथ्य वर्णनालाही द्यायला हवेत. त्या ठिकाणी त्याने आपली तथाकथित काव्यशक्ती आड येऊ दिली नाही हे त्याला भूषणास्पद आहे.

डॉ. शिवदे यांनी मिळविलेल्या या पोथीचे संपादन व मराठी रूपांतर करण्यास त्यांनी मला सुचविले. या त्यांच्या आत्मीयतापूर्ण व माझ्या आवडीच्या विषयातील सूचनेबद्दल मी त्यांचा मनःपूर्वक आभारी आहे. या पोथीचे मूळ कदाचित् साताऱ्याच्या दप्तरात किंवा मराठवाड्यातच इतरत्र कोठेतरी सापडेल अशी अपेक्षा व्यक्त करतो.

– डॉ. स. मो. अयाचित

श्रीगणेशाय नमः । श्री प्रतापदुर्गायै नमः । श्रीसीतारामाभ्यां नमः ।

१

बालार्काभं त्रिनेत्रं पृथुतरजठरं हस्तपद्मैर्दधानं दन्तं पाशाङ्कुशेष्टान् उरुकरविलसद् बीजापूराभिरामम् ।
बालेन्दुद्युतमौलिं करिवरवदनं दानपूरार्द्रगण्डं भोगीशाबद्धभूषं भजत गणपतिं रक्तवस्त्राङ्गरागम् ।।१
पुण्ये श्रीनैमिषारण्ये संस्थिताः शौनकादयः पप्रच्छुर्विनयत्सूतं प्रबद्धकरसंपुटाः ।।२

मुनयः ऊचुः ।

सूत त्वन्मुखतोऽस्माभिः श्रुतं नानाक्थानकम् ।
इदानीं श्रोतुमिच्छामः तत् त्वं वक्तुमिहार्हसि ।।३
क्षात्रं धर्मं पुरस्कृत्य राजानो जयकाङ्क्षिणः ।
कां देवतां पूजयन्ति कथं वीर्याधिकाः सदा ।।४
कस्या देव्याः प्रसादेन भवन्त्यत्र प्रतापिनः । विजयं सर्वदा युद्धे प्राप्नुवन्ति रणाजिरे ।।५
यस्याः समर्चनात् सिद्धिं सर्वे यान्त्यत्र मानवाः ।
लक्ष्मीयुक्ताः पुत्रपौत्रैः सुखिनः सर्वदाऽभवन् ।।६
न कदात्र रणाद् भ्रष्टा आसन् शत्रुजिता नृपाः ।
यस्या देव्याः प्रसादेन ताम् आख्याहि महामते ।।७
श्रुत्वा त्वन्मुखतो देवीं ताम् एवात्र निरन्तरम् ।
भजामः कामपूर्त्यर्थं ययासन् सर्वसंपदः ।।८
इति तेषाम् अभिप्रेतं श्रुत्वा सूतः प्रसन्नधीः । उवाच शौनकादीनां पुरतस्तुष्टमानसः ।।९

सूत उवाच ।

सम्यक् पृष्टं महाभागाः श्रोतव्यं स्वस्थमानसाः ।
प्रतापार्थं पार्थिवानां जयार्थं युद्धकाङ्क्षिणाम् ।।१०
या देवता क्षितावस्ति या नित्यं जयदा नृपान् ।
यस्याः समर्चनात् सिद्धिं सदैवायान्ति मानवाः ।।११
सुखिनः पुत्रपौत्राद्यैर्लक्ष्मीयुक्ता भवन्ति हि ।।
तां देवतां वदाम्यद्य भाविसंवादतः कलौ ।।१२
अग्रे भाविकथां भूतवद् वदाम्यद्य कौतुकात् ।
त्रिकालया ज्ञानदृष्ट्या दृष्ट्वा सर्वं कथानकम् ।।१३
पुराणादिषु सर्वत्र कथ्यते मुनिभिः सदा ।
भाविरामावतारोऽत्र यथा वाल्मीकिना पुरा ।।१४
वर्णितः पूर्वमेवायं तथा भाविकथोच्यते ।
भाविसंवादतः सर्वं कथ्यतेऽद्य कथानकम् ।।१५
कलेश्चतुःसहस्राणि शतान्यष्टौ तथा पुनः ।
पञ्चाशच्चापि वर्षाणि गमिष्यन्ति यदाग्रतः ।।१६



# १. ‘दीक्षित-सकवारबाई संवाद’

(उगवत्या) बालसूर्याप्रमाणे तेजस्वी असलेल्या, तीन नेत्र असलेल्या, बरेच मोठे उदर असलेल्या, करकमलात दात, पाश, आणि अंकुश अशी इष्ट (शस्त्रे) धारण करणाऱ्या, मोठ्या- सुंदर- (आणि) विकास पावणाऱ्या बीजपुराप्रमाणे (=लिंबाप्रमाणे) सुंदर असणाऱ्या, मस्तकावर चंद्रकोर आहे अशा, उत्तम हत्तीचे मुख असलेल्या, (व) मदस्रावाने गंडस्थल भिजून गेले आहे अशा, नागराजाला (बाहु) भूषणासाठी बांधलेल्या, रक्त वस्त्रे व रक्त उटणे असलेल्या गणपतीला वंदन करा. (= मी नमन करतो.)

२- पावन अशा नैमिषारण्यात उपस्थित असलेल्या शौनकादिकांनी हात जोडून विनयपूर्वक सुताला विचारले.

३- ऋषि म्हणाले- सुता ! तुझ्या मुखातून आम्ही अनेक कथानके ऐकली आहेत. आता आम्हाला जे ऐकण्याची इच्छा झाली आहे ते तू सांगावेस.

जयाकांक्षी राजे क्षात्र धर्माचा पुरस्कार करीत असताना कोणत्या देवतेची पूजा करतात? ते नेहमी अधिक पराक्रमी कसे राहतात? कोणत्या देवतेच्या प्रसादाने ते प्रतापी बनतात व रणांगणावर नेहमी युद्धात विजय कसे मिळवितात? जिच्या आराधनेने सर्व मानवांना सिद्धी/यश मिळते, आणि लक्ष्मीयुक्त राहून नेहमी मुलानातवंडांसह सुखी राहतात (अशी ही देवता कोण?) ज्या देवीच्या कृपेने शत्रूवर विजय मिळविणारे राजे कधीही युद्धातून माघारी वळले नाहीत, तिचे हे महामते वर्णन करा. आपल्या मुखाने त्या देवीचा (प्रभाव) ऐकल्यावर आम्ही आमच्या इच्छांच्या पूर्ततेसाठी तिची खंड न पाडता उपासना करू, जिच्यामुळे सर्वविध संपत्ति उपलब्ध झाली आहे (=होत असते.)

९ ऋषींच्या मनातील विचार ऐकून सूत प्रसन्न झाले, आणि संतुष्ट मनाने शौनकादिकांच्या समोर बोलू लागले.

१०-१२ सूत म्हणतात- महाभागांनो ! आपण चांगला प्रश्न विचारलात. स्वस्थ मनाने ऐकावे.

राजांच्या पराक्रमाला (वाव देणारी), युद्धेच्छू जय देण्यासाठी एक देवता या पृथ्वीवर आहे. ती नित्य राजेलोकांना जय मिळवून देते. तिच्या आराधनेने मानवांना नेहमीच यश मिळते. ते पुत्रपौत्रांसह लक्ष्मीयुक्त राहून सुखी असतात.

१२-१५ कलियुगात होणाऱ्या संवादांच्या माध्यमातून मी त्या देवतेचे वर्णन करतो. पुढे घडून येणारी गोष्ट ही झालीच आहे असे वाटण्यासारखे वर्णन मी रंगतदारपणे, सर्व कथानक त्रिकालदर्शी ज्ञानाच्या दृष्टिकोनातून, पूर्वी ज्याप्रमाणे वाल्मिकीने पुढे होणाऱ्या रामावताराचे वर्णन केले, आणि पुराणातून ऋषी सर्वत्र

तदा यो भाविसंवादः सोऽधुना कथ्यते मया।
भूतवद् विस्तरेणाद्य श्रुणुत स्वस्थ मानसाः ।।१७
कस्यचिन् नृपतेः पत्नी सुकुमारेति कीर्तिता।
नाम्ना राज्ञी द्विजाग्रण्यं रामचन्द्राख्य-दीक्षितम् ।।१८
कृष्णास्नानार्थमायातमग्निहोत्रद्वयान्वितम्।
दर्शनार्थं जनैः स्वीयैः समाहूय निजान्तिकम् ।।१९
सह्याद्युपत्यकायां च कृष्णावेण्योश्च दक्षिणे।
अतिलज्जावती पुण्या मध्ये कृत्वा पटान्तरम् ।।२०
गोपयित्वा निजं देहं राजनीत्यनुवर्तिनी।
समासीनं द्विजं नत्वा युक्ता स्वीयैर्वदिष्यति ।।२१
भवन्तं काव्यकर्तारं किंचिद् विज्ञापयाम्यहम्।
चिरकालं धृतं चित्ते मनोभिलषितं मया ।।२२
तत् सर्वं कथयिष्यामि तवाग्रे यद् द्विजोत्तम।
ममोपरि कृपां कृत्वा तत् सर्वं वक्तुमर्हसि ।।२३

**सुकुमारोवाच।**

ब्रह्मन् श्रुतं मया पूर्वं मम राज्ञः पितामहम्।
शिवभूपं प्रतापाख्या दुर्गासीद् वरदा सदा ।।२४
यत्प्रतापात् शिवेनात्र जिता यावनपार्थिवाः।
राज्यं सीमान्तम् आक्राम्य चकारासौ क्षितिविह ।।२५
लक्ष्मीं तां विपुलां लब्ध्वा सुखम् आप शिवो विभुः।
कुलदेवीं निजाम् मेने तां दुर्गां वरदायिनीम् ।।२६
तस्या देव्याश्च माहात्म्यं श्रोतुम् उच्छामि त्वन्मुखात्।
प्रतापदुर्गसंस्थाया महिमानं वदस्व माम् ।।२७
इति राज्ञीवचः श्रुत्वा रामचन्द्रः सदाव्रती।
उवाच दीक्षितो राज्ञ्यै प्रहृष्टेनान्तरात्मना ।।२८

**दीक्षित उवाच।**

राजपत्नि श्रुणुष्वाद्य सम्यक् पृष्टं त्वया मम।
प्रतापदुर्गामाहात्म्यं श्रवणाद् विजयप्रदम् ।।२९
महामङ्गलकृत् चेदं लक्ष्मीसौख्यप्रदायकम्।
पुत्रपौत्रप्रदं नृणां सर्ववाञ्छितदायकम् ।।३०
नानापद्मपुराणादिकार्त्तिकाख्यानसंग्रहात्।
प्रतापदुर्गामाहात्म्यं त्वां वदाम्यद्य विस्तरात् ।।३१

इति श्रीभविष्ये खिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
दीक्षितसुकुमार्याःसंवादो नाम प्रथमोऽध्यायः ।।१



सांगत आले, त्याप्रमाणे सांगतो. पूर्वी वर्णन केलेला कथाभाग तसेच पुढे घडून येणाऱ्या कथाही मी घडणाऱ्या संवादांच्या द्वारा याठिकाणी सांगतो-

१६-१७ कलियुगाची ४८५० वर्षे निघून जातील त्यावेळी घडून येणारा संवाद मी आता तो जणू काही घडून आला आहे, अशा रीतीने विस्ताराने सांगतो. आपण स्वस्थ चित्ताने ऐका.

१८-२३ एका राजाची सुकुमारा नावाची राणी कृष्णा नदीवर स्नानासाठी आलेल्या, दोन अग्निहोत्रे संपादन करणाऱ्या, व (कृष्णेच्या दर्शनासाठी आपल्या स्वीय जनांसह आलेल्या रामचंद्र दीक्षित नावाच्या एका अग्रगण्य ब्राह्मणाला आपल्या जवळ बोलावून (सांगते.) सह्याद्रीच्या पायथ्याशी, कृष्णा-वेण्णा नद्यांच्या दक्षिण तीरावर, मध्ये एक पडदा घेऊन संकोचाने, राजकीय शिष्टाचाराला धरून स्वतःला प्रत्यक्षात न येता, आसनस्थ झालेल्या (किंवा जवळ आलेल्या ब्राह्मणाला वंदन करून आपल्या बरोबरच्या सेवकांद्वारे विचारू लागते. "काव्यरचना करणाऱ्या आपणाला मी माझ्या मनात पुष्कळ काळ असलेली एक इच्छा सांगते. हे ब्राह्मणवर्या! आपणापुढे मी जे काही सांगेन (विचारीन) मजवर कृपादृष्टी ठेवून ते सर्व सांगावे."

२४-२५ सुकुमारा (सकवारबाई) म्हणते- "माझ्या राजांचे (= पतीचे) पितामह असलेल्या शिवाजीराजांवर प्रतापदुर्गा देवी नित्य प्रसन्न होती हे पूर्वीपासून माझ्या कानावर आहे. तिच्या प्रतापाने शिवाजीराजांनी यवन राजांवर विजय मिळविला, राज्याच्या सीमा ओलांडून त्या वरदायिनी आमच्या कुलदेवता दुर्गेला (प्रसन्न करून) विपुल संपत्ती मिळवून सुखी झाले. त्या देवीचे माहात्म्य आपल्याकडून ऐकण्याची इच्छा आहे. तेव्हा प्रतापगडावर असलेल्या त्या देवीचे माहात्म्य आपण मला सांगावे."

२८ नित्य धार्मिक व्रते धारण करणारे रामचंद्र दीक्षित राणीचे वाक्य ऐकून आनंदित अंतःकरणाने राणीला सांगू लागले-

२९-३१ दीक्षित म्हणतात- राणीसाहेब, ऐका. आपण चांगले विचारलेत- प्रतापदुर्गेचे माहात्म्य श्रवण करणाऱ्याला विजय देणारे, मंगल करणारे, संपत्ती आणि सौख्य देणारे, पुत्रपौत्र देणारे, मनुष्यांच्या सर्व इच्छा (पूर्ण) करणारे आहे. पद्मपुराणादी अनेक ठिकाणच्या कथासंग्रहांतून घेऊन प्रतापदुर्गा देवीचे माहात्म्य मी आपल्याला विस्ताराने सांगतो.

श्री भविष्यखिल सह्याद्री खंडातील 'प्रतापदुर्गामाहात्म्या'तील 'दीक्षित-सकवारबाई संवाद' नावाचा पहिला अध्याय.

।। श्रीदीक्षित उवाच ।।

सह्याद्रेः शिखरे स्थितात्र विमले श्रीढोळपाळाह्वये
दुष्टध्वंसकरी प्रतापकरिणी पाराख्यसत्पत्तने ।
या तत्पर्वतकन्दरान्तरमहच्छृङ्गाग्रदुर्गास्थिता
पातुं छत्रपतेः कुलं सुविमलं दुर्गा प्रतापाह्वया ।।१
तां नत्वा द्विजदीक्षितोऽहमधुना श्रीरामचन्द्राह्वयः
सर्वं तद्विषयं वदामि परमं माहात्म्यम् अत्यादरात् ।
राज्ञ्याज्ञापित एव सादरम् अहं माहात्म्यसंवर्णने
धन्योऽस्म्यद्य कुलं ममात्र विमलं धन्यं भवेद् भूतले ।।२
क्वाहं मन्दमतिर्विप्रः क्व देवी जगदम्बिका ।
तन्माहात्म्यवर्णनेऽद्य राज्ञ्या ज्ञापितवान् अहम् ।।३
कृष्णा कृष्णतनुः साक्षाद् वेणी देवो महेश्वरः ।
तत्संगमप्रभावं तु नालं वक्तुं चतुर्मुखः ।।४
उभयोः संगमो यत्र सप्ताद्रिर्योजन ।
क्रोशद्वये जरण्डाग्रे मुक्तिस्तत्र न संशयः ।।५
तत्समीपे शूलपाणिः पर्वतो परिवर्तते ।
मेरोः शिखरम् उत्तुङ्गं मेरुलिङ्गसमन्वितम् ।
सेतोः कृत्वा त्वत्र वानरैः ।।६
यवतेशोऽपि यत्रास्ति पञ्चक्रोशान्तरेण हि ।
सप्ताद्रौ मङ्गला देवी यत्र भक्तैकपालिनी ।।६
तयोर्नद्योः समुत्पत्तिं कीर्तयिष्यामि तां श्रणु ।
चाक्षुषस्यान्तरे पूर्वं मनोर्देवः पितामहः ।।७
सह्याद्रिशिखरे रम्ये यजनायोद्यतोऽभवत् ।
स कृत्वा यज्ञसंभारान् सर्वदेवगणैर्वृतः ।।८
पाटेश्वरः समीपेऽस्ति सप्ताद्रेः पूर्वदिकस्थितः ।।७
क(न)केश्वरश्च कृष्णायाम् उदक्तीरे विराजते ।
रोगैकशमनः (?) भक्तवाञ्छितदायकः ।।८
युक्तो हरिहराभ्यां च तद्गिरेः शिखरं ययौ ।
लक्ष्मीदुर्गे गिरेः शृङ्गे तस्थतुर्लीलयैव ते ।।९
भृग्वादयो मुनिगणा मुहूर्ते ब्राह्मदैवते ।
तस्य दीक्षाविधानाय समाजं तत्र चक्रिरे ।।१०
अथ ज्येष्ठां स्वरां पत्नीं विष्णुरावाहयत् तदा ।
सा शनैराययौ तावद् भृगुर्विष्णुम् उवाच ह ।।११

भृगुरुवाच ।।

विष्णो स्वरा त्वया हूताप्यायाति न हि सत्वरम् ।
मुहूर्तातिक्रमश्चैषः कायोर्दीक्षाविधिः कथम् ।।१२
नायाति चेत् स्वरा शीघ्रं गायत्र्यत्र विधीयताम् ।
एषापि न भवेदस्य भार्या किं पुण्यकर्मणि ।।१३



## २. 'कृष्णा-वेण्णा उगम वर्णन'

१-३ दीक्षित म्हणतात- सह्याद्रीच्या शिखरावरील पारगावात ढोळपाळ नावाच्या (भोरप्या) डोंगरावर दुष्टांचा नाश करणारी, प्रताप करविणारी या (सह्याद्री) पर्वताच्या गुहांमध्ये व त्याच्या उंच उंच शिखरावरील दुर्गांमध्ये वास्तव्य करणारी, छत्रपतींच्या विमल कुलाचे रक्षण करणारी, प्रतापदुर्गा नावाची (देवता) आहे. तिला वंदन करून मी रामचंद्र दीक्षित नावाचा ब्राह्मण तिचे श्रेष्ठ माहात्म्य व तिच्याविषयी सर्व काही आदराने सांगतो. राणीसाहेबांच्या आदरपूर्वक आज्ञेवरून हे माहात्म्य वर्णन करताना मला तर धन्यता वाटतेच; परंतु माझे सर्व कुलही पावन व धन्य झाले आहे. नाहीतर कोठे मी एक मंदमती ब्राह्मण आणि कोठे जगदंबिका देवी, व तिचे माहात्म्य वर्णन करून सांगण्यासाठी मला राणीसाहेबांनी आज्ञा केली.

४-१० कृष्णवर्णाची कृष्णा आणि वेण्णा नदीचा अधिष्ठाता साक्षात् महेश्वर, तेव्हा त्यांच्या संगमाचा प्रभाव सांगायला चतुर्मुख ब्रह्मही पुरे पडणार नाही. साताऱ्याला दोघींचा ज्या ठिकाणी संगम होतो तेथून दोन कोसांवर जरंडा नावाचे क्षेत्र आहे तेथे मुक्ती मिळते. त्याच्या जवळ शूलपाणि पर्वत आहे. मेरूलिंग असलेल्या उत्तुंग मेरू पर्वताच्या शिखरावर वानरांनी सेतू बांधला. तेथून पाच कोसांवर यवतेश आणि साताऱ्याला भक्तांचे रक्षण करणारी मंगला देवीही आहे. मी (कृष्णा-वेण्णा) या दोन नद्यांची उत्पत्ती कशी झाली ते सांगतो, ऐकावे. चाक्षुष मन्वंतरात पूर्वी मनूचा पितामह देव ?? सह्याद्रीच्या रम्य शिखरावर यज्ञ करण्याचा बेत ठरविला. त्याने सर्व देवांना बरोबर घेऊन यज्ञाची सामग्रीही जमविली. साताऱ्याच्या पूर्वेकडे पारेश्वर आहे. कृष्णेच्या उत्तर तीरावर कनकेश्वरही आहे. रोगाचे उपशमन करणारा आणि भक्तांचे वांछित देणारा, हरिहरांच्या बरोबर असलेला तो देव त्या पर्वताच्या शिखरावर गेला. शिखरावर लक्ष्मीच्या (दुर्गेच्या) किल्ल्यावर ते दोघे सहज पोचले. भृगु वगैरे मुनींनी ब्राह्म मुहूर्तावर त्यांना दीक्षा देण्यासाठी लोक जमविले.

११-१५ भृगु म्हणतात – त्याच वेळी विष्णूने स्वरा या आपल्या ज्येष्ठ पत्नीला बोलविले. ती हळूहळू येते, तेवढ्यात भृगु ऋषी विष्णूला म्हणाले, "विष्णू, तू बोलाविल्यावर देखील स्वरा लौकर येत नाही. मुहूर्त टळावा असे

एवम् एवहि रुद्रोऽपि भृगोर्वाक्यम् अमोदत।
तच्छ्रुत्वा स भृगुर्वाक्यं गायत्रीं ब्रह्मणस्तदा ।।१४
निवेश्य दक्षिणे भागे दीक्षाविधिम् अकारयत्।
यावद् दीक्षाविधिं तस्य विधेश्चक्रुर्मुनीश्वराः ।।१५
तावद् अभ्याययौ तत्र स्वरा यज्ञस्थलं जवात्।
ततस्तां दीक्षितां दृष्ट्वा गायत्रीं ब्रह्मणा सह ।।१६
सपत्नीर्षापरा क्रोधात् स्वरा वचनम् अब्रवीत्।
अपूज्या यत्र पूज्यन्ते पूज्यानां च व्यतिक्रमः ।।१७
त्रीणि तत्र भविष्यन्ति दुर्भिक्षं मरणं भयम्।
मदासने कनिष्ठेयं भवद्भिः संनिवेशिता ।।१८
तस्मात् सर्वे जडीभूता नदीरूपा भविष्यथ।
उयं च दक्षिणे भागे ह्युपविष्टा मदासने ।।१९
तस्माल्लोके सदाऽदृश्या तनुरूपास्तु निम्नगा।

दीक्षित उवाच।

ततस्तच्छापमाकर्ण्य गायत्री कम्पिता धरा ।।२०
समुत्थायाशपद्देवैर्वार्यमाणापि तां स्वराम्।।

गायत्र्युवाच।।

तव भर्ता यथा ब्रह्मा ममाप्येषस्तथा खलु ।।२१
वृथाशपस्त्वं मां यस्माद् भव त्वमपि निम्नगा।

दीक्षित उवाच।

ततो हाहा कृताः सर्वे शिवविष्णुमुखाः सुराः ।।२२
प्रणम्य दण्डवद् भूमौ स्वरां तत्र विजिज्ञपुः।

देवा ऊचुः।

देवि सर्वे त्वया शप्ता ब्रह्माद्या ये त्वयाधुना ।।२३
यदि सर्वे जडीभूता भविष्यावात्र निम्नगाः।
तदा लोकत्रयं ह्येतद् विनश्यति हि निश्चितम् ।।२४
अविवेकः कृतस्तस्माच्छापोऽयं विनिवर्तताम्।

स्वरोवाच।

नार्चितो हि गणाध्यक्षो यज्ञादौ यत् सुरोत्तमाः ।।२५
अस्माकं बाल एवायम् उति मत्वास्य हेलनम्।
कृतम् अत्र तु युष्माभिस्त्वद्य दैवविमोहितैः ।।२६
तस्माद् विघ्नं समुत्पन्नं मत्क्रोधजम् उदं खलु।
नापि मद्वचनं ह्येतद् असत्यं तु भविष्यति ।।२७
तस्मात् स्वांशैर्जडीभूता यूयं भवथ निम्नगाः।
आवाम् अपि सपत्न्यौ च स्वांशाभ्यां चारुनिम्नगे ।।२८
भविष्यावोऽत्र भो देवाः पश्चिमाभिमुखावहे।

दीक्षित उवाच।

इति तद्वचनं श्रुत्वा ब्रह्माविष्णुमहेश्वराः ।।२९



तिला वाटत असावे. दीक्षाविधी कसा पार पडणार? ती जर लौकर आली नाही तर गायत्रीकडून करवावा– तीही जर नसेल तर भार्येचा चांगल्या कामासाठीही काय उपयोग?'' हो हो असे म्हणून रुद्राने देखील भृगूच्या बोलण्याला अनुमोदन दिले. हे ऐकल्यावर भृगूने ब्रह्मदेवाची (पत्नी) गायत्री हिला (त्याच्या) उजवीकडे बसवून दीक्षाविधी पार पाडला. मुनिश्वरांनी दीक्षाविधी संपविताच स्वरा घाई केल्याचे (दाखवीत) यज्ञाच्या स्थलावर आली. ब्रह्म्यासह गायत्रीला दीक्षा दिलेली पाहताच स्वरा ही तिची सवत मत्सराने राग येऊन म्हणाली, ''ज्या ठिकाणी आदरणीय नसलेल्यांना मान दिला जातो, आणि आदरार्ह व्यक्ती बाजूला सारल्या जातात त्या ठिकाणी दुर्भिक्ष, मरण आणि भय ही तीन संकटे उपस्थित होतात. माझ्या आसनावर माझ्यापेक्षा एका कनिष्ठ स्त्रीला आपण बसविले आहे, तेव्हा आता सर्वजण जडरूप घेऊन नदी व्हाल आणि ही उजव्या बाजूला माझ्या जागेवर बसलेली अदृश्य बनून एक लहानशी नदी बनेल.''

२०–२५ दीक्षित म्हणतात– तेव्हा तिचा शाप ऐकून गायत्री (पृथ्वीबरोबरच) थरथर कापू लागली, आणि सर्व देव तिला आवरीत असतानाही तिने देखील स्वराला उठून शाप दिला. गायत्री म्हणाली, ''ब्रह्मदेव तुझा भर्ता आहे तसाच माझाही आहे. तू मला उगाचच शाप दिलास. त्यामुळे आता तूही नदी हो.'' त्यावेळी शिव, विष्णू आणि सर्व देव हा हा करीत स्वरेपुढे दंडवत घालून तिला म्हणाले, ''हे देवी ! तू आज ब्रह्मदेवादी सर्वांनाच शाप दिला आहेस. ते सर्व जड बनून नद्या बनले तर ही तिन्ही लोक नष्टच झाले (म्हणावयाचे). तू हा अविवेक केला आहेस. तेव्हा शाप परत घे.'' स्वरा म्हणाली, ''हे देवांनो, यज्ञ सुरू करण्याअगोदर तुम्ही गणपतीची(ही) पूजा केली नाहीत.''

२६–२९ हा आमचा बालकच आहे असे समजून तुम्ही दैवयोगाने मूढ बनून त्याची अवहेलना केली आहे. त्यामुळेच माझ्या क्रोधातून निर्माण झालेले विघ्न आले. पण माझे वाक्य असत्य होणारे नाही बरे! त्यामुळे आपल्या अंशानी जड बनून तुम्ही नद्या बनणारच, आम्ही दोघी सवती देखील आपल्या अंशानी सुंदर नद्या बनू. हे देवांनो, तुम्ही पश्चिमाभिमुख आहात.

२९–३५ दीक्षित म्हणतात– तिचे हे भाषण ऐकून ब्रह्मा, विष्णू, महेश्वर जडीभूत होऊन आपल्या अंशानी नद्या बनले. विष्णू झाला कृष्णा नदी, महेश्वर झाले वेण्णा आणि ब्रह्मदेव बनले वशिंड असलेली (?) गंगा. इतर देवही

जडीभूता (अ)भवन् नद्यः स्वांशैर् एव तदात्र ते।
तत्र विष्णुर् अभूत् कृष्णा वेणी देवो महेश्वरः ।।३०
ब्रह्मा ककुद्मिनी गङ्गा पृथग् एवाभवन् क्षितौ।
देवाः स्वानपि तानंशान् जडीकृत्य विचिक्षिपुः ।।३१
सह्याद्रिशिखरेऽभ्यस्ताः पृथग् आसंस्तु निम्नगाः।
देवांशैः पूर्ववाहिभ्यो बभूवुः पश्चिमावहाः ।।३२
तत्पत्न्यंशैः पृथक् तत्र शतशोऽथ सहस्रशः।
नानागिरिवरशृङ्गान् निर्गताश्चापि काश्चन ।।३३
ताभिः क्षितितलं व्याप्तं जनपापं व्यपोहितुम्।
गायत्री च स्वरा चैव पश्चिमाभिमुखी तदा ।।३४
योगेनैवाभवन् नद्यः सावित्रिति प्रथां गते।
ततो मुहूर्ते चान्ये तु गणेशं पूज्यसादरम् ।।३५
स्वरया तं मखं पूर्णं गायत्र्या चाकरोद् विधिः।
ब्रह्मणा स्थापितौ तत्र यज्ञे हरिहरावुभौ ।।३६
महाबलातिबलिनौ नाम्ना देवौ बभूवतुः।
लक्ष्मी च गिरिजा चापि सह्यपर्वतमूर्धनि ।।३७
कन्दराशृङ्गवेर्यत्र तस्थतुर्मुदिते सदा।
एकरूपं धृतं ताभ्यां भर्तृवन्न पृथक् धृतम् ।।३८
सैव लक्ष्मी स्मृता चात्र सैव दुर्गा प्रगीयते।
यस्या(ः) संदर्शनाद् एव षण्ढानाम् अपि वीर्यता ।।३९
जायते क्रियते सर्वैः प्रतापः स्वस्वकर्मणि।
अतः प्रतापदुर्गेति तस्या नामात्र गीयते ।।४०
अर्चिता सकलैर्देवैः स्तुता ध्याता च वन्दिता।
ददाति सकलान् सिद्धिसंघान् नृणां निरन्तरम् ।।४१
नन्दा भगवती नाम या भविष्यति नन्दजा।
हत्वा शुम्भं निशुम्भं च या विन्ध्याचलसंस्थिता ।।४२
सैवात्र वीर्यदा भक्तान् समागत्य स्थिता चिरम्।
कारयामास किंचित् सा स्वगणैः सह्यपर्वते ।।४३
कृष्णावेण्योश्च माहात्म्यं नाहं वक्तुं क्षमस्त्विह ।।४४
अतो ब्रह्मादयो देवाः स्वांशैर्जातास्तु निम्नगाः।
तत्कारणं मया राज्ञि त्वदग्रे कथितं त्विदम् ।।४५
कृष्णोद्भवं पापहरं पुमान् यः
शृणोति यः श्रावयते च भक्त्या।
स्यात् तस्य पुंसः सकलं फलं यत्
तद्दर्शनस्नानगमोद्भवं स्मृतम् ।।४६

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
कृष्णावेण्यो उत्पत्तिवर्णनं नाम द्वितीयोऽध्यायः ।।२



आपापल्या अंशांनी जड होऊन पडले. सह्याद्रीच्या माथ्यावर अशा अनेक नद्या तयार झाल्या. देवांशरूप नद्या पूर्वेकडे तर त्यांच्या पत्नीचा अंश असलेल्या नद्या पश्चिमेकडे अशा शेकडो, हजारो नद्या पर्वतावरील माथ्यावर वाहू लागल्या. त्यांनी पृथ्वी व्यापून गेली. लोकांची पापे दूर करण्यासाठी गायत्री आणि स्वरा पश्चिमेकडे वळून योगानेच सावित्री म्हणून प्रसिद्ध झाल्या.

३५-३६ तेव्हा दुसऱ्या एका मुहूर्तावर इतरांनी गणेशाची भक्तीने पूजा केल्यावर स्वरेने तो यज्ञ पूर्ण केला, आणि गायत्रीने विधी पार पाडला. ब्रह्मदेवाने त्या ठिकाणी यज्ञात हरिहरांची स्थापना केली.

३७-४० महाबल आणि अतिबली या नावाचे दोन दैत्य होऊन गेले. लक्ष्मी आणि गिरिजा याही सह्याद्री पर्वताच्या शिखरावर गुहेमध्ये शृंगवेर येथे आनंदाने राहत होत्या. आपल्या पतीपुढे वेगवेगळे नव्हे, तर दोघींनी एकच रूप धारण केले होते. याठिकाणी तिलाच लक्ष्मी म्हणतात, तिलाच दुर्गाही म्हणतात. तिच्या दर्शनानेच षण्ढांमध्ये वीर्य निर्माण होते. सर्वजण आपापल्या कृत्यात पराक्रम दाखवितात. म्हणून या स्थळी तिला प्रतापदुर्गा असे म्हटले जाते.

४१-४४ सर्व देवांकडून अर्चना, स्तुती, ध्यान आणि वंदना केली गेलेली (ही देवी) मानवाच्या सतत सर्व प्रकाराची यशःसिद्धी देत असते. भगवती नंदा, तीच नंदजा बनेल व शुंभ-निशुंभांचा विंध्याचलावर राहून नाश करील. सह्यपर्वतावर तिने--

तीच भक्तांना वीर्य देऊन या ठिकाणी येऊन नेहमीसाठी राहिली आहे. कृष्णा आणि वेण्णा नद्यांचे माहात्म्य या ठिकाणी वर्णन करण्यास मजजवळ सामर्थ्य नाही.

४५-४६ अशा रीतीने ब्रह्मादी देव आपापल्या अंशांनी नद्या बनले, त्याचे कारण, राणीसाहेब, मी आपल्यापुढे सांगितले. जो मनुष्य हे कृष्णेचे पाप हरण करणारे (माहात्म्य) भक्तिपूर्वक ऐकतो, आणि इतरांना ऐकवितो त्याला कृष्णेच्या दर्शनाने, स्नानाने आणि (येथे) येण्याने मिळणारे सर्व फळ मिळते.

'कृष्णा-वेण्णा उगम वर्णन' नावाचा दुसरा अध्याय.

मुनयः ऊचुः ।
सूत राज्ञीदीक्षितयोः संवादोऽयं त्वयेरितः ।
तयोर्वंशादिकथनं न त्वया समुदीरितम् ।।१
तयोर्वंशादिकं सर्वं श्रोतुकामा वयं त्विह ।
इति तेषाम् अभिप्रेतं श्रुत्वा सूतः प्रसन्नधीः ।।२
अब्रवीत् सादरं विप्रान् नैमिषारण्यसंस्थितान् ।
सूत उवाच ।
अग्रे प्रसंगतः सर्वं विदितं तद् भविष्यति ।।३
वदिष्यन्ति जनास्त्वत्र कृतम् आदौ नृवर्णनम् ।
दीक्षितस्य यतेश्चापि राज्ञीराज्ञोर्बटोर् अपि ।।४
सत्याः शैवादिकानां च मतिमत्सु कवेर् अपि ।
पतिव्रतादिनारीणां शास्त्रज्ञस्य द्विजस्य च ।।५
महापुरुषसंज्ञानां ज्ञानिनां तत्त्ववादिनाम् ।
स्तवने नैव दोषोऽस्ति प्रसंगाद् वर्णनादिना ।।६
अतस्त्रयोदशेऽध्याये दीक्षितस्य कथानकम् ।
नृपस्य नृपपत्न्याश्च वंशवृत्तं निवेद्म्यहम् ।।७
उत्युक्त्वा तान् मुनीन् सर्वान् दीक्षितास्यसमुद्भवाम् ।
पुनर्भाविकथां वक्तुं सूतः समुपचक्रिरे ।।८
दीक्षित उवाच ।
एवं सा शिखराग्रस्थं दुर्गान्तर निवासिनी ।
प्रतापदुर्गा भुव्यत्र समायाता चिरं स्थिता ।।९
यस्याः प्रसादात् सकलैस्त्रैलोक्यान्तरवासिभिः ।
प्रतापो लभ्यते नित्यं स्वस्वकर्मणि भूतले ।।१०
दुर्गाकुण्डम् इति ख्यातं दुर्गान्तरविराजितम् ।
तत्र तीर्थं महत् पुण्यं स्नानाल्लक्ष्मीप्रदं नृणाम् ।।११
दुर्गाधो नगरं रम्यं पर्वतान्तरमध्यजम् ।
पारेति नामधेयेन विख्यातं भुवि तत् स्मृतम् ।।१२
पारप्रदेशवहिनी निम्नगा कोयनाह्वया ।
सैवेयं पापहा ब्रह्मन् तेजोरूपा ककुद्मिनी ।।१३
गिरेर्दुर्गममार्गात् तु शोकयुक्तं मुखं भवेत् ।
जनस्यान्तः शोकमुखो मार्गो नाम्नात्र गीयते ।।१४
महाबलातिबलिनौ सह्यपर्वतमूर्धनि ।
तयोः पश्चिमदेशेऽस्ति दुर्गा शृङ्गाग्रसंस्थिता ।।१५
यदा यज्ञार्थम् आयातौ विधेर् देवौ गिरो उह ।
तदा हरिहरौ गत्वा पश्चिमेऽब्धेस्तटं प्रति ।।१६



## ३. 'श्रीराम वनात गमन'

१-३ मुनी म्हणाले- हे सुता ! तुम्ही राणी आणि दीक्षित यांचा झालेला संवाद सांगितलात; परंतु त्यांच्या घराण्यासंबंधी काहीच सांगितले नाहीत. त्यांच्या घराण्यासंबंधी सर्व काही आम्हाला ऐकण्याची इच्छा आहे.

त्यांच्या मनातील जिज्ञासा ऐकल्यावर सूत प्रसन्न झाले. नैमिषारण्यात बसलेल्या त्या विप्रांना आदरपूर्वक ते सांगू लागले.

३-८ सूत म्हणाले- प्रसंगाप्रसंगाने पुढे सर्व आपल्याला समजेलच. लोक म्हणतील की आधी राजाचे वर्णन केले, दीक्षित व्रतीचे केले, आणि राजा राणी आणि त्यांच्या मुलाचे वर्णन केले. शैवादी (संप्रदायस्थ) आणि (प्रतिभावंत) कवी यांच्या मताप्रमाणे पतिव्रता, शास्त्रज्ञ, विप्र, महापुरुष म्हणण्यासारखे ज्ञानी आणि तत्त्वज्ञ यांची स्तुती वर्णनाच्या ओघात प्रसंगानुसार केली तर ती दोषावह नाही. यासाठी तेराव्या अध्यायात दीक्षिताची हकिकत, व राजा आणि राणी यांची वंशकथा मी सांगेन. असे म्हणून त्या सर्व मुनींना दीक्षितांच्या मुखातून प्रकट झालेली भावी (ऐतिहासिक) कथा सांगण्यास सुतांनी आरंभ केला.

९-१५ दीक्षित म्हणतात- अशा रीतीने (सह्याद्रीच्या) शिखरावर असलेली, किल्ल्यात राहणारी प्रतापदुर्गा पृथ्वीवर येऊन स्थिर झाली. तिच्या प्रसादाने सर्व त्रैलोक्यात राहणाऱ्यांनी पृथ्वीवर आपापल्या कर्माप्रमाणे नित्य पराक्रम केला. किल्ल्याच्या अंतर्भागात दुर्गाकुंड आहे. ते मानवासाठी त्यात स्नान केल्याने संपत्ती मिळवून देणारे असे मोठेच पावन तीर्थ आहे. त्या पर्वताच्या मध्यात पार नावाचे एक रम्य नगर पृथ्वीवर प्रसिद्ध आहे. पारगावाच्या परिसरातून वाहणारी कोयना नदी, हे ब्राह्मणलोकांचे पापनाशक आणि तेजोरूप आहे. त्या पर्वताच्या दुर्गम वाटेवर लोकांचे मुख (= मन) दुःखी होते, म्हणून त्याला 'शाकेमुख' मार्ग असे म्हणतात. सह्य पर्वताच्या माथ्यावर महाबली आणि अतिबली राहत होते. त्यांच्या पश्चिमेकडे दुर्गा शिखराच्या वर आहे.

१६-१८ जेव्हा या पर्वतावर देवयोगाने (?) देव यज्ञासाठी आले तेव्हा हरी आणि हर पश्चिम समुद्राच्या तटावर जाऊन त्यांनी स्नान केले व समुद्रकिनारीच हरिहर (नामक) लिंगाची स्थापना केली. त्यांनी समुद्रात महापुण्यकारक असे शंखतीर्थही सिद्ध केले. सागराजवळच सावित्री संगमही आहे. त्याठिकाणी पश्चिमेला हरिहरेश्वर (मंदिर) प्रसिद्ध आहे.

१९-२३ जिच्या कृपेने माणसांतील संबंध निश्चितपणे संपुष्टात येतात असा

स्नात्वा हरिहरं लिङ्गं स्थापयित्वाब्धिरोधसि।
शङ्खतीर्थं महत् पुण्यं चक्रतुः सागराम्भसि ।।१७
सावित्रीसंगमस्तत्र वर्तते सागरेण हि।
हरिहरेश्वरो देवस्तत्र ख्यातोऽस्ति पश्चिमे ।।१८
यस्य प्रसादात् संबन्धा नृणां नश्यन्ति निश्चयात्।
पुत्रपौत्रप्रदो देवः सेवया भुवि कीर्त्यते ।।१९
एवं प्रतापदुर्गात्र समायाता चिरं त्विह।
स्थास्यत्यग्रे नृणां शौर्यप्रदा दुर्गान्तरस्थिता ।।२०
शिवराज्ञे प्रसन्नेयं यथा जाता कलौ उह।
तत् सर्वं कथयिष्यामि त्वग्रे शाहुमनोरमे ।।२१
बहूनां निर्जरादीनां काले कालेऽतिसंकटे।
वीर्यदेयं सदा भूम्यां जातात्रेति मया श्रुतम् ।।२२
तत् तत् सर्वं सविस्तारं पुराणादिषु कीर्तितम्।
विविच्य निजबुद्ध्याहं त्वां वदाम्यद्य सुव्रते ।।२३
इक्ष्वाकुवंशे प्रवरो रामो दाशरथी महान्।
अयोध्यायां बभूवात्र सीताकान्तो महाद्युतिः ।।२४
तं रामं गुणसंपन्नं राजा सत्यपराक्रमम्।
यौवराज्येन संयोक्तुम् ऐच्छत् प्रीत्या महीपतिः ।।२५
तस्याभिषेकसंभारान् दृष्ट्वा भार्याथ कैकयी।
पूर्वदत्तवरा देवी वरम् एनम् अयाचत ।।२६
विवासनं च रामस्य भरतस्याभिषेचनम्।
स सत्यवचनाद् राजा धर्मपाशेन संयतः ।।२७
विवासयामास स सुतं रामं दशरथः प्रियम्।
स जगाम वनं वीरः प्रतिज्ञाम् अनुपालयन् ।।२८
पितुर्वचननिर्देशात् कैकेय्याः प्रियकारणात्।
तं व्रजन्तं प्रियो भ्राता लक्ष्मणोऽनुजगाम ह ।।२९
भ्रातरं दयितो भ्रातुः सौभ्रात्रम् अनुदर्शयन्।
रामस्य दयिता भार्या नित्यं प्राणसमा हिता ।।३०
जनकस्य कुले जाता देवमायेव निर्मिता।
सीताप्यनुगता रामं शशिनं रोहिणी यथा ।।३१
पौरैर् अनुगतो दूरं पित्रा दशरथेन च।
शृङ्गबेरपुरे सूतं गङ्गाकूले व्यसर्जयत् ।।३२
गृहम् आसाद्य धर्मात्मा निषादाधिपतिं प्रियम्।
गुहेन मानितो रामो लक्ष्मणेन च सीतया ।।३३
ते वनेन वनं गत्वा नदीस्तीर्त्वा बहूदकाः।



पुत्रपौत्रप्रद देव सेवेमुळे पृथ्वीवर वाखाणला जातो (?) याप्रकारे प्रतापदुर्गा या ठिकाणी येऊन स्थिर झाली आहे व ती पुढेही मनुष्यात शौर्य निर्माण करून किल्ल्याच्या मध्ये राहणार आहे. कलियुगात आलेली ही देवी शिवाजीराजांवर प्रसन्न आहे. राणीसाहेब, हा सर्व भाग मी पुढे सांगणारच आहे. माझ्या कानावर (तर) असे आहे की पुष्कळ देवांना वेळोवेळी संकटे वाढली तेव्हा त्यांच्यात पराक्रम निर्माण केला व ती आता पृथ्वीवर अवतरली आहे. हे सर्व पुराणांमध्ये सविस्तर सांगितलेले आहे. ते मी माझ्या कल्पनेप्रमाणे आज विवेचनपूर्वक सुव्रत असलेल्या आपणाला सांगतो.

२४-३० इक्ष्वाकु वंशात महातेजस्वी सीताकांत दाशरथी अशा श्रेष्ठ रामाचा जन्म अयोध्येत झाला. (दशरथ) राजाला त्याच्यावरील प्रेमाने पराक्रमी व गुणसंपन्न राजा म्हणून यौवराज्याभिषेक करावा असे वाटले. त्याच्या अभिषेकासाठी सामग्री (जमा होत असलेली) पाहून त्याची भार्या कैकयी हिने, आपल्याला पूर्वी वर मागण्यास सांगितलेले (आठवून) दशरथराजाला वर मागितला. रामाला राज्यातून बाहेर काढणे व (त्याच्या जागी) भरताला अभिषेक करणे (असा तो वर होता). आपले वचन खरे करण्याचा प्रसंग असल्याने राजा धर्मपाशांनी बांधला गेला. दशरथाने प्रिय पुत्र रामाला बाहेर जाण्यास सांगितले, (आणि त्याप्रमाणे) प्रतिज्ञेचे पालन करण्यासाठी शूर असा (रामही) वनाला गेला. पित्याच्या सूचनेप्रमाणे, कैकयीला बरे वाटावे म्हणून (रामाची) प्रिय पत्नी आणि बंधू लक्ष्मण हेही त्याच्याबरोबर निघाले. बंधुभाव दर्शविणारा राम त्याच्याविषयी स्निग्ध होताच, आणि त्याची प्रिय पत्नी (सीता) नित्य त्याच्या प्राणासारखीच होती.

३१-३२ जनकाच्या कुलामध्ये दैवी माया म्हणून जन्मलेली सीताही रामाबरोबर जाऊ लागली, रोहिणी चंद्राबरोबरच असते त्याप्रमाणे. पिता दशरथ आणि पौरजन दूरपर्यंत येऊन शृंगवेर नगरात गंगाकाठी त्याला निरोप देते झाले.

३३-३५ निषादांचा राजा गुह (रामाला) प्रिय असल्याने धर्मात्मा (राम) त्याच्याकडे गेला. लक्ष्मण, सीता, आणि राम यांना गुहाने मान दिला. ( नंतर) ते (तिघे) वनामागून वने, आणि भरपूर पाणी असलेल्या अनेक नद्या पार करून चित्रकुटात आले. (तिथे) भारद्वाज (ऋषींच्या) आज्ञेवरून ते सुंदर कुटी बांधून त्या जंगलातच रमून गेले. देवगंधर्वांप्रमाणे तेजस्वी असलेले ते त्या ठिकाणी सुखाने राहू लागले.

३६-४४ चित्रकुटाला पोचल्यावर राजा दशरथ पुत्रवियोगामुळे उत्कंठित होऊन पुत्रासाठी आक्रोश करीत स्वर्गाला गेला. तो स्वर्गस्थ झाल्यावर वसिष्ठादी

चित्रकूटम् अनुप्राप्य भरद्वाजस्य शासनात् ।।३४
रम्यम् आवसथं कृत्वा रममाणा वने त्रयः ।
देवगन्धर्वसंकाशा तत्र ते न्यवसन् सुखम् ।।३५
चित्रकूटं गते रामे पुत्रशोकातुरस्तदा ।
राजा दशरथः स्वर्गं जगाम विलपन् सुतम् ।।३६
गते तु तस्मिन् भरतो वसिष्ठ प्रमुखैर्द्विजैः ।
नियुज्यमानो राज्याय नैच्छद् राज्यं महाबलः ।।३७
स जगाम वनं वीरो रामपादप्रसादकः ।
गत्वा तु सुमहात्मानं रामं सत्यपराक्रमम् ।।३८
अयाचद् भ्रातरं रामम् आर्यभावपुरस्कृतः ।
त्वम् एव राजा धर्मज्ञः इति रामं वचोऽब्रवीत् ।।३९
रामोऽपि परमोदारः सुमुखः सुमहायशाः ।
न चैच्छत् पितुर् आदेशाद् राज्यं रामो महाबलः ।।४०
पादुके चास्य राज्याय न्यासं दत्वा पुनः पुनः ।
निवर्तयामास ततो भरतं भरताग्रजः ।।४१
स कामम् अनवाप्यैव रामपादौ उपस्पृशन् ।
नन्दिग्रामेऽकरोद् राज्यं रामागमनकाङ्क्षया ।।४२
गते तु भरते श्रीमान् सत्यसंधो जितेन्द्रियः ।
रामस्तु पुनर् आलक्ष्य नागरस्य जनस्य च ।।४३
तत्रागमनम् एकाग्रो दण्डकान् प्रविवेश ह ।
अत्रेर् आश्रमम् आगत्य ह्यनसूयां ददर्श सः ।।४४

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
रामस्य वनप्रयाणं नाम तृतीयोऽध्यायः ।।३



द्विजांनी भरताला राज्यावर नियुक्त केले. (महापराक्रमी अशा भरताला) राज्याची इच्छा नव्हती. रामाच्या चरणसेवेसाठी तोही वनात गेला, आणि तेथे त्याने सत्यपराक्रमी आणि महात्मा बंधू रामाला उदार विचारांनी पुरस्कृत होऊन विनंती केली, 'धर्मज्ञ असल्यामुळे तूच (खरा) राजा आहेस.' रामदेखील (भरताप्रमाणेच) अत्यंत उदारबुद्धी आणि महायशस्वी होता. महाबलवान् अशा त्याला पित्याच्या आज्ञेनुसार राज्याची इच्छा नव्हती. (तेव्हा) राज्यासाठी आपल्या पादुका त्याला ठेव म्हणून देऊन भरताचा थोरला बंधू राम याने भरताला परतण्यासाठी पुनःपुन्हा विनविले. आपली इच्छा सिद्ध होत नाही असे पाहून रामाच्या चरणांना स्पर्श करून (भरत) राम (पुनः) परत येईल अशी प्रतीक्षा करीत नंदिग्रामात राज्य करू लागला. भरत (परत) गेल्यानंतर सत्यप्रतिज्ञ, जितेंद्रिय असा श्रीमान् राम नगरातील आणि (ग्रामातील) लोकांकडे लक्ष देऊन व पुनः परतण्यासाठी मन एकाग्र करून दंडकारण्यात प्रवेश करता झाला. अत्रि (ऋषीच्या) आश्रमात येऊन त्याने अनसूयेचे(ही) दर्शन घेतले.

'श्रीराम वनात गमन' नावाचा तिसरा अध्याय.

दीक्षित उवाच।
प्रविश्य तु महारण्यं रामो राजीवलोचनः।
विराधं राक्षसं हत्वा शरभङ्गं ददर्श ह।।१
सुतीक्ष्णं चाप्यगस्त्यं च दृष्ट्वागस्तेः सहोदरम्।
अगस्त्यवचनात् चैव जग्राहैन्द्रं शरासनम्।।२
खड्गं च परमः प्रीतस्तूणौ अक्षयसायकौ।
वसतस्तस्य रामस्य वने वनचरैः सह।।३
ऋषयोऽभ्यागमन् सर्वे वधायासुरराक्षसाम्।
स तेषां प्रति शुश्राव राक्षसानां तदा वने।।४
प्रतिज्ञातश्च रामेण वधः संयति रक्षसाम्।
ऋषीणाम् अग्निकल्पानां दण्डकारण्यवासिनाम्।।५
तेन तत्रैव वसता जनस्थाननिवासिनी।
विरूपिता शूर्पणखी राक्षसी कामरूपिणी।।६
ततः शूर्पणखावाक्याद् उद्युक्तान् सर्वराक्षसान्।
खरं त्रिशिरसं चैव दूषणं चापि राक्षसम्।।७
निजघन रणे रामस्तेषां चैव पदानुगान्।
वने तस्मिन् निवसता जनस्थाननिवासिनाम्।।८
रक्षसां निहतान्यासन् सहस्राणि चतुर्दश।
ततो ज्ञातिवधं श्रुत्वा रावणः क्रोधमूर्छितः।।९
सहायं वरयामास मारीचं नाम राक्षसम्।
वार्यमाणः सुबहुशो मारीचेन स रावणः।।१०
न विरोधो बलवता क्षमो रावण तेन ते।
अनाहत्य तु तद्वाक्यं रावणः कालचोदितः।।११
जगाम सहमारीचस्तस्याश्रमपदं तदा।
तेन मायामृगाद् दूरम् अपवाह्य नृपात्मजौ।।१२
जहार भार्यां रामस्य गृध्रं हत्वा जटायुषम्।।
गृध्रं च निहतं दृष्ट्वा हतां श्रुत्वा च मैथिलीम्।।१३
राघवः शोकसंतप्तो विललापाकुलेन्द्रियः।
ततस्तेनैव शोकेन गृध्रं दग्ध्वा जटायुषम्।।१४
मार्गमाणो वने सीतां राक्षसं स ददर्श ह।
कबन्धं नाम रूपेण विकृतं घोरदर्शनम्।।१५
तं निहत्य महाबाहुर्ददाह स्वर्गतश्च सः।
स चास्य कथयामास शबरीं धर्मचारिणीम्।।१६
श्रामणीं धर्मनिपुणाम् अभिगच्छेति राघवम्।
सोऽभ्यगच्छन् महातेजाः शबरीं शत्रुसूदनः।।१७



## ४. 'रामाने वालीचा वध केला'

१-५ दीक्षित म्हणतात- कमलनयन रामाने महारण्यात प्रवेश केल्यावर विराध राक्षसाला मारून शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्य आणि अगस्त्याचा भाऊ या (ऋषींचे) दर्शन घेतल्यावर अगस्त्याच्या सूचनेवरून इंद्राचे धनुष्य आणि खड्ग तसेच भात्यासह अक्षय बाण मिळविले व अत्यंत संतुष्ट झाला. वनात राहणाऱ्या लोकांसह रामही वनात राहात असताना सर्व ऋषींनी त्याची भेट घेतली, आणि रामाने असुर आणि राक्षस यांचा नाश करण्याचे त्यांना आश्वासन दिले. त्यावेळी वनातील राक्षसांचा युद्धात वध करण्याची प्रतिज्ञा(च) त्याने केली. दंडकारण्यात राहणाऱ्या अग्नीप्रमाणे (जाज्वल्य) अशा ऋषींना अभय दिले.

६-१५ तेथेच जनस्थानात राहणाऱ्या, हवे ते रूप घेणाऱ्या शूर्पणखा राक्षसीला विद्रूप केले. नंतर शूर्पणखेने आपल्या भाषणाद्वारा प्रोत्साहित केलेल्या सर्व राक्षसांना; खर, त्रिशिरस आणि दूषण या राक्षसांनाही रणात रामाने मारले. तसेच त्या वनात, जनस्थानात राहणाऱ्या त्यांच्या अनुयायी राक्षसांनाही (त्याने मारले.) चौदा सहस्र राक्षस मारले गेले. आपल्या ज्ञातीचा वध झाल्याचे समजताच रावण रागाने मूर्च्छित(च) झाला. त्याने मारीच नावाच्या राक्षसाला आपला साहाय्यक म्हणून निवडले. अनेक प्रकारांनी मारीचाने रावणाला आवरण्याचा (प्रयत्न) केला. 'रावणा! अरे बलवानाबरोबर तुझ्याकडून विरोध होऊ शकणार नाही.' परंतु कालानेच प्रेरणा केलेल्या रावणाने त्याच्या त्या भाषणाकडे दुर्लक्ष करून तो मारीचासह रामाच्या आश्रमाकडे गेला. मायेने एक हरिण निर्माण करून त्या दोघा (राम-लक्ष्मण या) राजकुमारांना दूर नेले व रामाची भार्या सीता हिला जटायू गृध्राचा वध करून पळविले. गृध्राचा वध झाला, आणि मैथिली (सीतेला) पळविले गेले हे ऐकताच राम शोकाने संतप्त झाला. सर्व इंद्रियशक्ती विकल होऊन रामाने खूप विलाप केला. त्या शोकाग्नीनेच त्याने जटायू गृध्राला अग्निसंस्कार करून जंगलातून सीतेचा शोध करीत असताना त्याला कबंध नावाचा एक विरूप आणि भयानक असा राक्षस दिसला.

१६-२४ महाबाहू रामाने त्याला मारून दाह (संस्कार) केला आणि तो (कबंध) स्वर्गाला गेला. त्याने धर्माचरण करणाऱ्या शबरीसंबंधी (रामाला) सांगितले व धर्मनिपुण अशा त्या श्रमणीला जाऊन भेट असे रामाला सांगितले

शबर्या पूजितः सम्यक् रामो दशरथात्मजः ।
पम्पातीरे हनुमता संगतो वानरेण ह ।।१८
हनुमद्वचनात् चैव सुग्रीवेण समागमः ।
सुग्रीवाय च तत् सर्वं रामो शंसन् महाबलः ।।१९
आदितस्तद् यथावृत्तं सीतायाश्च विशेषतः ।
सुग्रीवश्चापि तत् सर्वं श्रुत्वा रामस्य वानरः ।।२०
चकार सख्यं रामेण प्रीतश्चैवाग्निसाक्षिकम् ।
ततो वानरराजेन वैरानुकथनं प्रति ।।२१
रामाय आवेदितं सर्वं प्रणयाद् दुःखितेन च ।
प्रतिज्ञातं च रामेण तदा वालिवधं प्रति ।।२२
वालिनश्च बलं तत्र कथयामास वानरः ।
सुग्रीवः शङ्कितश्चासीन् नित्यं वीर्येण राघवे ।।२३
राघवप्रत्ययार्थं तु दुन्दुभेः कायम्उत्तमम् ।
दर्शयामास सुग्रीवो महापर्वतसंनिभम् ।।२४
उत्स्मयित्वा महाबाहुः प्रेक्ष्य चास्थिमहाबलः ।
पादाङ्गुष्ठेन चिक्षेप संपूर्णं दशयोजनम् ।।२५
बिभेद च पुनस्तालान् सप्तैकेन महेषुणा ।
गिरिं रसातलं चैव जनयन् प्रत्ययं तदा ।।२६
ततः प्रीतमनास्तेन विश्वस्तः स महीपतिम् ।
किष्किन्धां रामसहितो जगाम च गुहां प्रति ।।२७
ततोऽगर्जद् हरिवरः सुग्रीवो हेमपिङ्गलः ।
तेन नादेन महता निर्जगाम हरीश्वरः ।।२८
अनुमान्य तदा तारां सुग्रीवेण समागतः ।
निजघान च तत्रैवं शरेणैकेन राघव ः ।।२९
ततः सुग्रीववचनाद् हत्वा वालिनम्आहवे ।
सुग्रीवम्एव तद्राज्ये राघवः प्रत्यपादयत् ।।३०
स च सर्वान् समानीय वानरान् वानरर्षभः ।
दिशः प्रस्थापयामास दिदिक्षुर् जनकात्मजाम् ।।३१
तदा मारुतिम्आहूय राघवः प्रत्यभाषत ।
सीताशुद्धिं समानेतुं समर्थस्त्वं मतो मम ।।३२
अतस्त्वं याहि हरिभिर् दक्षिणां दिशम् आदरात् ।
महान्तो राक्षसास्तस्यां तान् त्वं जेष्यसि निश्चयात् ।।३३
इति रामवचः श्रुत्वा मारुतिः प्राह राघवम् ।
रघुनाथ जगन्नाथ दक्षिणस्यां हि सागरः ।।३४
बहवो राक्षसाः सन्ति तत्र शक्तिः कथं मम ।



महातेजस्वी, शत्रुनाशक राम शबरीकडे गेले. शबरीने त्याची पूजा चांगल्या प्रकारे केली, (व) दाशरथी राम पंपा (सरोवराच्या) तीरावर वानर (विशेष) हनुमानाबरोबर (राहिला.) हनुमानाच्या सांगण्यावरून सुग्रीवाने रामाशी संबंध वाढविला. रामाने(हि) सुग्रीवाला सर्व काही वृत्त आरंभापासून घडले तसे सांगितले; विशेषतः सीतेविषयी. सुग्रीव वानरानेही ते सर्व रामाकडून ऐकल्यावर त्याने रामाबरोबर मैत्री वाढविली. अग्निसाक्षिक मैत्रीने तो खूष झाला. नंतर वानरराज (सुग्रीवानेही) रामाला सर्व काही प्रणयजन्य दुःखाने (स्वतःविषयी सांगून) सूड घेण्याविषयी रामाला विनंती केली. वालिवधाविषयी रामानेही त्याला आश्वासन दिले. सुग्रीवाने वालीच्या सामर्थ्याचा रामाला अंदाज दिला. पराक्रमाबद्दल सुग्रीवाच्या (मनात) रामाविषयी सतत शंका होती. परंतु रामाला विश्वास वाटावा म्हणून सुग्रीवाने महापर्वताप्रमाणे उत्तम दुंदुभी दाखविला.

२५-३० तो पाहून महाबाहू (रामाने) उत्साहाने आपल्या पायाच्या (अंगठ्याच्या तडाख्याने) पूर्ण दहा योजनांचा (भाग) चिरडला, धनुष्याने सात ताडांचा पाडाव केला, आणि पर्वत आणि रसातल, यातही भय निर्माण केले. तेव्हा (रामाच्या पराक्रमाविषयी) विश्वास वाटून तो (सुग्रीव) आनंदित मनाने रामासह किष्किंधा (नगरीच्या आपल्या) गुहेकडे गेला. सोन्याप्रमाणे पिंगल वर्ण अशा त्या श्रेष्ठ वानरराज सुग्रीवाने गर्जना केली. त्या गर्जनेच्या मोठ्या आवाजाने वानरराज (वाली) बाहेर आला, आणि तारेला सांगून सुग्रीवाकडे (धांवून) आला. रामाने एकाच बाणाने त्याठिकाणी त्याला मारले. अशारीतीने सुग्रीवाच्या सांगण्यावरून रणामध्ये वालीला मारल्यावर रामाने सुग्रीवालाच त्याचे राज्य (पुनः) दिले.

३१-३५ वानरश्रेष्ठ (सुग्रीवाने) सर्व वानरांना एकत्र बोलावून जनकनंदिनी (सीतेच्या) शोधासाठी सर्व दिशांना पाठविले. रामाने त्या वेळी मारुतीला बोलावून सांगितले की, 'सीतेला शोधून आणण्यासाठी माझ्या कल्पनेप्रमाणे तू(च) समर्थ आहेस. तेव्हा तू वानरांना घेऊन दक्षिणेकडे जा. दक्षिणेकडे मोठमोठे राक्षस असले (तरी) तू निश्चितच त्यांच्यावर जय मिळवशील.' रामाचे असे बोलणे ऐकून मारुती रामाला म्हणाला, 'हे जगन्नाथा रामा! दक्षिणेकडे सागर आहे, व (पलीकडे) पुष्कळच राक्षस आहेत. तेथे माझी शक्ती कशी चालेल ?'

३५-३८ रामचंद्र म्हणतात- 'मारुते! रावणादी राक्षसांचे निवारण करू

श्रीरामचन्द्र उवाच।

मारुते रावणादीनां राक्षसानां निवारणम्।।३५
कर्तुकामस्ततो याहि शरणं जगदम्बिकाम्।
तद् रामवचनं श्रुत्वा मारुतिः प्रत्यभाषत।।३६

मारुतिर् उवाच।

देव्या नाना स्थलान्यत्र वर्तन्ते रघुनन्दन।
काहं व्रजामि तद् ब्रूहि यत्र सिद्धिर् जवाद् भवेत्।।३७
तत् तस्य वचनं श्रुत्वा रामो ध्यात्वा क्षणं हृदि।
मारुतेर् वीर्यवृद्ध्यर्थं तं पुनः प्रत्यभाषत।।३८

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
रामेण वालिवधो नाम चतुर्थोध्यायः।।४



इच्छित आहेस, तर जगदंबिकेला शरण जा.' ते रामाचे भाषण ऐकून मारुती पुनः म्हणतो, 'रामा! या (भागात) देवीची अनेक स्थाने आहेत, मी कोठे जाऊ? मला लौकर यश मिळेल असे (स्थान) सांगा.' त्याचे भाषण ऐकून रामाने क्षणभर मनात ध्यान केले व मारुतीची शक्ती वाढविण्यासाठी त्याला पुनः स्पष्ट करू लागला.

'रामाने वालीचा वध केला' नावाचा चौथा अध्याय.

श्रीरामचन्द्र उवाच ।
सह्याद्रि शिखराग्रस्थदुर्गान्तरनिवासिनीम् ।
प्रतापदुर्गा त्वं याहि शरणं वीर्यदा भवेत् ।।१
यस्याः प्रसादाद् बहवो वीर्यवन्तोऽभवन्निह ।
अतस्तस्याः प्रसादेन वीर्यवान् त्वं भविष्यसि ।।२
इति रामगिरं श्रुत्वा रामं नत्वा पुनः पुनः ।
ययौ आकाशमार्गेण क्षणात् सह्याद्रिपर्वतम् ।।३
प्रतापदुर्गां तां नत्वा तदाराधनतत्परः ।
ताम्एव चिन्तयन्नित्यं नियतात्मा जितेन्द्रियः ।।४
चकार तुष्टां तां देवीं प्रतापाख्यां जवेन सः ।
ततः प्रसन्ना सोवाच मारुतिं शरणागतम् ।।५
मारुते त्वां प्रसन्नाऽस्मि वीर्यवान् भव मद्गिरा ।
प्रतापं कुरु लङ्कायां राक्षसान् मारयाधुना ।।६
त्वद्बाहुयुगुले नित्यं स्थित्वाहं कार्यसाधिनी ।
विचरिष्यामि त्वत्साकं त्वत्प्रतापार्थम् आदरात् ।।७
अन्यत् शृणुष्वाञ्जनेय यद् वदामि तवाधुना ।
मां प्रेषितोऽसि रामेण किमर्थं तद् वदाम्यहम् ।।८
यस्य भ्रूभङ्गमात्रेण ब्रह्मादीनां लयो भवेत् ।
तस्य रामस्य किं शक्तिः कुण्ठितास्त्यधुना त्वयि ।।९
वीर्यदानेऽत्र मां यस्मात् प्रेषितस्तद् वदाम्यहम् ।
प्रतापदुर्गा इति मे यन्नाम जगतीतले ।।१०
तत् सत्यं कर्तुकामेन रामेण प्रेषितोऽसि माम् ।
कृपाकटाक्षं रामस्य यस्य वाञ्छाम्यहं सदा ।।११
अतस्त्वं याहि रामं तं नत्वा लङ्कां व्रजाधुना ।
राक्षसेन्द्रचमूमध्ये प्रतापं त्वं करिष्यसि ।।१२
रणात् पराङ्मुखस्त्वं हि न कदात्र भविष्यसि ।
इति देव्या वरान् लब्ध्वा दुर्गां नत्वा स मारुतिः ।।१३
प्रवर्षणगिरिस्थं तं रामं नत्वा तदाज्ञया ।।
ययौ वानरवृन्देन दक्षिणं लवणार्णवम् ।।१४
ततो गृध्रस्य वचनात् संपातेर् हनुमान् बली ।
शतयोजनविस्तीर्णं पुप्लुवे लवणार्णवम् ।।१५
तत्र लङ्कां समासाद्य पुरीं रावणपालिताम् ।
ददर्श सीतां ध्यायन्तीम् अशोकवनिकागताम् ।।१६
निवेदयित्वाभिज्ञानं प्रवृत्तिं च निवेद्य च ।
समाश्वास्य च वैदेहीं मर्दयामास तोरणम् ।।१७
पञ्चसेनाग्रगां नुत्वा सप्तमं त्रिषु तान् अपि ।
शूरम् अक्षं विनिष्पिष्य हत्वा तं जम्बुमालिनम् ।।१८



## ५. 'हनुमंताला प्रतापदुर्गेचे वरदान'

रामचंद्र म्हणतात.- १-५ ''सह्याद्रीच्या शिखरावर असलेल्या किल्ल्यात राहणाऱ्या प्रतापदुर्गा (देवीला) तू शरण जा, ती तुला शौर्य देईल. तिच्या प्रसादाने अनेक लोक पराक्रमी झाले, तेव्हा तिच्या कृपेने तूही पराक्रमी होशील.'' असे रामाचे बोलणे ऐकल्यावर, पुनःपुन्हा रामाला नमस्कार करून (हनुमान) आकाशमार्गाने त्वरित सह्याद्रीजवळ पोचला व त्या प्रतापदुर्गा (देवीला) वंदन करून तिच्या आराधनेसाठी तत्पर बनला. सतत तिचेच चिंतन करीत मनाचे व इंद्रियांचे संयमन करून त्याने त्या प्रतापदुर्गा देवीला लौकरच प्रसन्न केले.

५-१५ प्रसन्न होऊन शरण आलेल्या मारुतीला ती म्हणाली, ''हनुमाना! मी तुझ्यावर प्रसन्न झाले आहे. माझ्या वचनाने तू पराक्रमी हो(शील). आता तू लंकेत (जाऊन) पराक्रम दाखव, (आणि) राक्षसांना मार. मी सदैव तुझ्या दोन बाहूंमध्ये राहून (हे) कार्य साधीन. तू प्रताप दाखवावास यासाठी मी गांभीर्याने तुझ्याबरोबर संचार करीन. शिवाय आता मी तुला जे सांगणार आहे ते, हे अंजनीपुत्रा ऐक. रामाने तुला माझ्याकडे पाठविले. कशासाठी? मी सांगते. ज्याने (नुसती) भुवई चढविली की ब्रह्मादिक (देवही) लयाला जातील त्या रामाची शक्ती सध्या तुझ्यामध्ये कुंठित झाली आहे. म्हणूनच तुला पराक्रम करण्याची (शक्ती ) मिळावी यासाठी माझ्याकडे ज्या हेतूने पाठविले तो मी सांगते. सर्व जगात प्रतापदुर्गा हे जे नाव झाले आहे ते यथार्थ व्हावे असे रामाच्या मनात असल्याने त्याने तुला माझ्याकडे पाठविले आहे. त्या रामाच्या कृपाकटाक्षाची मला इच्छा आहे. तेव्हा तू जाऊन रामाला वंदन करून लंकेला जा. राक्षसांच्या राजाच्या (रावणाच्या) सैन्यात तू (मोठा) पराक्रम गाजविशील. तेथे तुला केव्हाही रणातून पराङ्मुख व्हावे लागणार नाही.''

अशा रीतीने देवीकडून वर मिळाल्यावर मारुती दुर्गेला वंदन करून व प्रवर्षण पर्वतावर असलेल्या रामाला(ही) वंदन करून, त्याच्या आज्ञेने वानरसेना घेऊन तो दक्षिणेकडे लवण सागराकडे निघाला. नंतर संपाती गृध्राच्या सांगण्याप्रमाणे बलवान हनुमानाने शंभर योजनांचा विस्तार असलेल्या लवण सागरावरून उडी घेतली, व लंकेला नगरात पोचून रावणाने संरक्षित ठेवलेल्या, अशोक वनात असलेल्या, व ध्यानमग्न असलेल्या सीतेचे दर्शन घेतले. खुणेची (अंगठी) दाखवून व (सर्व) हकिकत सांगून सीतेला आश्वस्त केल्यावर (वनद्वारावरील) तोरण चुरगळून टाकले.

मेघनादेन समरं कृत्वा देवीवरेण सः ।
रावणं द्रष्टुकामः सन् ग्रहणं समुपागमत् ।।१९
अस्त्रेणोन्मुक्तम् आत्मानं ज्ञात्वा देव्याः प्रसादतः ।
मर्दयन् राक्षसान् वीरो यन्त्रिणस्तान् यदृच्छया ।।२०
ततो दग्ध्वा पुरीं लङ्काम् ऋते सीतां च मैथिलीम् ।
रामाय प्रियम्आख्यातुं पुनर् आयान् महाबलः ।।२१
सोऽभिगम्य महात्मानं कृत्वा रामं प्रदक्षिणम् ।
न्यवेदयद् अमेयात्मा दृष्टा सीतेति तत्त्वतः ।।२२
ततः सुग्रीवसहितो गत्वा तीरं महोदधेः ।
समुद्रं क्षोभयामास शरैर् आदित्यसंनिभैः ।।२३
दर्शयामास चात्मानं समुद्रः सरितां पतिः ।
समुद्रवचनात् चैव नलसेतुम् अकारयत् ।।२४
तेन गत्वा पुरां लङ्कां हत्त्वा रावणम्आहवे ।
रामः सीताम् अनु प्राप्य परां व्रीडाम् उपागमत् ।।२५
तामुवाच ततो रामः परुषं जनसंसदि ।
अमृष्यमाणा सा सीता विवेश ज्वलनं सती ।।२६
ततोऽग्निवचनात् सीतां ज्ञात्वा विगतकल्मषाम् ।
कर्मणा तेन महता त्रैलोक्यं सचराचरम् ।।२७
सदेवर्षिगणं तुष्टं राघवस्य महात्मनः ।
बभौ रामः संप्रहृष्टः पूजितः सर्वदेवतैः ।।२८
अभिषिच्य च लङ्कायां राक्षसेन्द्रं विभीषणम् ।
कृतकृत्यस्तदा रामो विज्वरः प्रमुमोद ह ।।२९
देवताभ्यो वरं प्राप्य समुत्स्थाप्य च वानरान् ।
अयोध्यां प्रस्थितो रामः पुष्पकेन सुहृद्वृतः ।।३०
भरद्वाजाश्रमं गत्वा रामः सत्यपराक्रमः ।
भरतस्यान्तिकं रामो हनूमन्तं व्यसर्जयत् ।।३१
पुनर् आख्यायिकां जल्पन् सुग्रीवसहितस्तदा ।
पुष्पकं तत् समारुह्य नन्दिग्रामं ययौ तदा ।।३२
नन्दिग्रामे जटां हित्वा भ्रातृभिः सहितोऽनघः ।
रामः सीताम् अनुप्राप्य राज्यं पुनर् अवाप्तवान् ।।३३
एवं सा वायुपुत्राय प्रसन्ना जगदम्बिका ।
यथा तथा मया सर्वं राजपत्नि तवोदितम् ।।३४
अतः प्रतापदुर्गेयं प्रतापार्थं निरन्तरम् ।
सेवनीया जनैः सर्वैः वीर्यदात्री रणाजिरे ।।३५

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
हनूमते प्रतापदुर्गायाः वरदानं नामं पञ्चमोऽध्यायः ।।५



(रथाचा) अक्ष मोडून त्या शूर जंबुमालीला मारले व देवीच्या वराच्या (कृपेने) मेघनादाबरोबर युद्ध करून व रावणाला पाहण्यासाठी (बाहेर पडून) परत आला.

२०-२१ देवीच्या प्रसादेवरून आपण अस्त्रापासून पूर्णपणे मुक्त आहोत असे मनात आणून (हनुमान) वीर यन्त्रे (=अस्त्रे) घेतलेल्या राक्षसांना मोकाटपणे मारीत, मैथिली सीतेशिवाय सर्व लंकापुरीचे दहन करून तो महाबलवान (हनुमान) रामाला प्रिय (वार्ता) सांगण्यासाठी परत आला.

२२-३० येऊन व महात्म्या रामाला प्रदक्षिणा घालून त्या महामनाने (हनुमानाने) मी सीतेला प्रत्यक्ष पाहिले असे सांगितले. नंतर (रामाने) सुग्रीवाबरोबर समुद्रतीरावर जाऊन आपल्या सूर्यासारख्या (तेजस्वी) बाणांनी समुद्रात क्षोभ उत्पन्न केला. तेव्हा नद्यांचा स्वामी समुद्र प्रकट झाला. समुद्राच्या सूचनेप्रमाणे (रामाने) जलसेतू तयार करविला. त्यावरून लंकापुरीला जाऊन रामाने युद्धात रावणाला मारल्यावर सीतेची प्राप्ती होताच त्याला अत्यंत लज्जा उत्पन्न झाली. लोकसमूहात राम तिला कठोर (शब्दात) बोलला. ते सहन न होऊन सती सीतेने अग्निप्रवेश केला. तेव्हा अग्नीच्या भाषणावरून सीता निर्दोष आहे असे समजल्यावर त्या (अग्निदिव्यरूप) मोठ्या कृत्याने देव व ऋषिगण यांसह सर्व चराचर त्रैलोक्याला महात्मा रामावर प्रसन्न झाले. सर्व देवांकडून मान मिळालेला राम हर्षाने शोभू लागला. राक्षसराज बिभीषणाला लंकेत राज्याभिषेक करून कृतकृत्य झालेल्या रामाला चिंतामुक्त झाल्याने आनंद झाला. देवांकडून वर मिळवून व वानरांची तेथे पुनः स्थापना करून राम आपल्या मित्रांबरोबर पुष्पक (विमानातून) अयोध्येकडे निघाला.

३१-३३ सत्यपराक्रम राम भारद्वाज (ऋषींच्या) आश्रमात भरताच्या निकट गेला व हनुमानाला निरोप दिला. पुनः सर्व घटनांचा आढावा घेत सुग्रीवासहित तो पुष्पक (विमानात) चढून नंदिग्रामाकडे गेला. निष्पाप रामचंद्र नंदिग्रामास गेल्यावर त्याने जटा काढून टाकल्या व बंधुगणाबरोबर सीतेची प्राप्ती करून घेतल्याने पुनः राज्य मिळविले.

३४-३५ याप्रमाणे जगदंबिका वायुपुत्र (हनुमानावर) प्रसन्न झाली हे सर्व मी यथातथ्य राणीसाहेबांसमोर निवेदन केले. तेव्हा सर्व जनांनी निरंतर प्रतापी बनण्यासाठी प्रतापदुर्गा (देवीची) आराधना करावी, ती(च) रणांगणावर शौर्य देणारी आहे.

'हनुमंताला प्रतापदुर्गेचे वरदान' नावाचा पाचवा अध्याय.

दीक्षित उवाच।

अन्यत् च सुकुमाराङ्गि त्वां वदाम्यधुना वरम्।
प्रतापदुर्गामाहात्म्यं तव प्रीत्यै मनोरमम्।।१
पुरा पुरंदरस्यास्य युद्धं च बलिना सह।
देवानां चैव दैत्यानां द्वंद्वयुद्धम् अभूत् ततः।।२
स निर्जित्य बलिं दैत्यं पातालतलवासिनम्।
पुनर् भुवं समासाद्य चोतथ्यस्याश्रमं ययौ।।३
तत्रापश्यत् च तत्पत्नीं गुर्विणीं मदगामिनीम्।
चलच्छ्रोणीतटाबद्धकाञ्चीदाम्ना सुमण्डिताम्।।४
क्वणत्कङ्कणनिर्घोषजातमत्तालिकोकिलाम्।
फल्गुकृताम्बरारामां नूपुराभ्यां सुविस्मिताम्।।५
चलत्कुम्भस्तनाभ्यां च मुक्ताहारैः सुशोभिताम्।
हसत्पद्ममुखां दिव्यान्य(क्)कृतोत्पललोचनाम्।।६
केतुक्युदरपाण्डुभ्यां गण्डाभ्यां च मनोरमाम्।
क्षामां च सुदतीं दीनां पर्णशालामुखे स्थिताम्।।७
स्वपन्तीं शयने क्वापि तां दृष्ट्वा मोहम्आगतः।
बलात्कारेण बुभुजे गुर्विणीं पाकशासनः।।८
गर्भस्थस्तु तदा जीवः स्वस्य पातविशङ्कया।
छादयामास वै योनिद्वारं पादेन दुःखितः।।९
ततश्चस्कन्द तद्वीर्यं भूमौ एव बलिद्विषः।
गर्भस्थाय चुकोपासौ भगवान् पाकशासनः।।१०
तं शशाप च गर्भस्थं रुषातिताम्रलोचनः।।
जात्यन्धो भव दुर्बुद्धे त्वं ममास्यायतः पदाः।।११
प्रच्छादितं रतिद्वारं ततो दीर्घतमाह्वयः।
पादात् प्रस्कन्दिताद् वीर्याजयन्तः समजायत।।१२
पश्चाद् उन्द्रो ययौ शीघ्रं ऋषेः शापविशङ्कितः।
पलायन्तं हरिं दृष्ट्वा जहसुर्बटवोऽखिलाः।।१३
ततस्तु व्रीडितो भूत्वा ययौ मेरोर्गुहां शुभाम्।
तत्र लीनश्चचारोऽसौ दुश्चरं वै तपो महत्।।१४
मेरौ विलीय वसति देवेन्द्रे लज्जयान्विते।
गूढैर्विज्ञाय तां वार्तां दैतेया बलिपूर्वकाः।।१५
स्वर्गम् आक्रम्य बुभुजे बलिश्चाप्यमरावतीम्।
दिक्पालानां विभूतीनां शम्बराद्या बलीयसः।।१६
बलाद् बुभुजिरे हीननाथ राष्ट्रे दिवौकसः।
रक्षितारम्अजानन्तो देवाश्चाग्निपुरोगमाः।।१७



## ६. 'इंद्रदोष कारण वर्णन'

दीक्षित म्हणतात- १-३ सकवार बाईसाहेब! आता मी तुम्हाला उत्तम व रमणीय असे प्रतापदुर्गामाहात्म्य सांगतो, ते आपणास आवडेल. पूर्वी पुरंदर इंद्राचे बलीबरोबर युद्ध झाले. तेव्हा देव आणि दैत्य यात द्वंद्वयुद्धे होत असत. पाताळात राहणाऱ्या बलीचा पराजय करून इंद्र नंतर पृथ्वीवर आला व उतथ्य (ऋषीच्या) आश्रमाकडे गेला.

४-६ तेथे त्याने पाहिले की त्याची गर्भवती पत्नी होती. आपल्याच नशेत चालणारी, श्रोणी तटावर बांधलेल्या हलणाऱ्या कंबरपट्ट्याच्या सुवर्णाने चमकणारी, किणकिणणाऱ्या कंकणाच्या आवाजाने मत्त भुंगे आणि कोकिळांचा (भास) करविणारी, उगीचच पांघरलेल्या वस्त्राने (विश्रांतिसुख घेणारी, नूपुरांच्या (आवाजाने) आनंदित झालेली, कुंभाप्रमाणे (भरगच्च असलेल्या) स्तनांनी व (त्यावरील) मोत्यांच्या हारांनी शोभणारी, विकसित होणाऱ्या कमलाप्रमाणे (आल्हादकारक) मुख असणारी, (किंबहुना) कमळालाही कमी लेखणारे नयन असलेली, दिव्य (भासणारी), केवड्याप्रमाणे पांढुरक्या गालांनी मनोरम वाटणारी, उत्कृष्ट दंतपंक्ती असलेली, क्षीण आणि दीन झालेली ती (ऋषीच्या) पर्णशालेच्या आरंभीच असलेल्या बिछान्यावर झोपलेली होती. तिला पाहिल्यावर इंद्राला मोह उत्पन्न झाला व त्याने त्या गर्भवतीचा बलात्काराने उपभोग घेतला.

९-१४ त्यावेळी गर्भात असलेला जीव आपण खाली पडू या भीतीने दुःखित होऊन त्याने आपल्या पायाने योनिद्वार झाकले. बलीचा शत्रू असलेल्या इंद्राचे वीर्य त्यामुळे जमिनीवर सांडले. भगवान पाकशासन इंद्र त्या गर्भस्थ जीवावर रागावला. रागाने डोळे लालभडक झालेल्या (इंद्राने) त्याला शाप दिला, 'हे दुर्बुद्धे! तू जन्मतःच अंध होशील. तू आपला पाय माझ्या आड आणलास, व रतिद्वार झाकून टाकलेस. तुला (लोक) दीर्घतमा म्हणतील' पुढे त्या पायावर सांडलेल्या वीर्यापासून जयंताचा जन्म झाला.

१३-१५ (शाप दिल्या) नंतर इंद्र ऋषीच्या शापाने भिऊन तत्काळ बाहेर आला. (आश्रमातील) सर्व बटू इंद्राला पळताना पाहून हसू लागले. त्यामुळे लज्जित होऊन तो मेरू (पर्वताच्या) एका सुंदर गुहेकडे गेला, व त्या ठिकाणी नम्र होऊन त्याने दुश्चर/कठीण मोठे तप आरंभिले. लज्जेने युक्त झालेला देवांचा (राजा) इंद्र मेरू (पर्वतावर) लपून बसला आहे हे बलीच्या दैत्यांना हेरांकडून समजल्यावर ती वार्ता त्यांनी (बलीला) सांगितली.

१६-२० बलीदेखील स्वर्गावर आक्रमणाद्वारा कब्जा करून (इंद्राच्या राजधानी) अमरावतीवर राज्य करू लागला. बलवान असे शंभरादी (दैत्य)

पप्रच्छुर्धिषणं देवं देवाश्चार्यम्अकल्मषम्।
पप्रच्छुरिन्द्रवृत्तान्तं क्व चातिष्ठति नः प्रभुः ॥१८
दैत्याक्रान्तम् इदं राष्ट्रं हीननाथं दिवौकसाम्।
कुतो नायाति देवोऽसौ भूयान् कालो गतो विभो ॥१९
प्रयामो यत्र धिषणः प्रार्थयामश्च तं प्रभुम्।
इति पृष्टस्तु देवैश्च धिषणस्तान् उवाच ह ॥२०
रसातले बलिं जित्वा चोतथ्यस्याश्रमं ययौ।
भुक्त्वा पत्नीं च धाष्ट्यॆन तच्छिष्यैर् एव निन्दितः ॥२१
व्रीडितस्तु दिवं यातुं गुहां मेरोर्विवेश ह।
तत्रैवास्ते शचीयुक्तः स्वकृतं चिन्तयन् विभुः ॥२२
इति तस्य वचः श्रुत्वा देवा अग्निपुरोगमाः।
गुहां मेरोर्ययुः शीघ्रं स्वीयं प्रार्थयितुं विभुम् ॥२३
तत्र दृष्ट्वा गुहालीनं देवेन्द्रं पाकशासनम्।
तुष्टुवुर्विविधैस्स्तोत्रैस्तद्वीर्यैर्लोकविश्रुतैः ॥२४
"शचीपते नमस्तेऽस्तु सर्वदेवाधिपः सदा।
वयं दैत्यैः स्पर्धिताश्च त्वया हीना भृशार्दिताः ॥२५
स्थानभ्रष्टाश्चरामोऽत्र नानादेशेषु दुःखिताः।
तस्माद्आगत्य देवेन्द्र जहि शत्रून् अरिंदम" ॥२६
इति स्तुतस्तदा देवैर्निश्चक्राम गुहामुखात्।
लज्जयावनतो भूत्वा पश्यन् भूमिं च चक्षुषा ॥२७
तम्ऊचुर्विबुधाः सर्वे दृष्ट्वा लज्जान्वितं हरिम्।
मा शङ्का ते सुरपते कर्माधीनम्उदं जगत् ॥२८
मानामानौ सुखं दुःखं लाभालाभौ जयाजयौ।
पूर्वकर्मानुरोधेन भवत्येव न संशयः ॥२९
जीवाः कर्मानुगं दुःखं दिष्टं कालेन कालतः।
प्राज्ञाः प्राप्य न शोचन्ति न हृष्यन्ति च वै सुखात् ॥३०
तस्मात् प्रारब्धंनःप्राप्यं दुःखं चेदं तव प्रभो।
तत् प्राप्यम्एव दुःखं त्वं नैव शोचितुम् अर्हसि ॥३१
इत्युक्तो वाक्पतिं प्राह मघवान् अमराधिपः।
"परस्त्रीसंगदोषेण बलं वीर्यं यशोऽमलम् ॥३२
मन्त्रशक्तिः शास्त्रशक्तिर्विद्याशक्तिश्च मानद।
अस्त्रशक्तिः शस्त्रशक्तिर्देहशक्तिश्च धीर्मम ॥३३
बभूवुर्नष्टवीर्याश्च तूष्णीं तेन वसाम्यहम्।"
इत्येवम् उक्तश्चेन्द्रेण देवैर्युक्तो गिरांपतिः ॥३४
मन्त्रयामास देवैश्च पुनस्तस्य बलाप्तये।



दिक्पाल अशा विभूतींच्या (व) स्वर्गात राहणाऱ्या (देवांच्या) राष्ट्रावर कोणी स्वामी नसल्यामुळे जबरदस्तीने प्रभाव गाजवू लागले. आपले रक्षण कोण करणार हे न समजल्याने देवही अग्नीला पुढे करून बृहस्पतीला विचारू लागले. देवही त्या निर्दोष (अशा बृहस्पतीला) इंद्राची बातमी (सांगून) 'आमचा राजा कोठे आहे,' असे विचारू लागले. आपले राष्ट्र दैत्यांनी आक्रांत केले आहे, देवांना कोणी राजा (राहिलेला) नाही, आमचा (राजा) देव बराच काळ गेला तरी अजून कसा येत नाही, आपण बृहस्पतीकडे जाऊ, आणि त्या प्रभूची प्रार्थना करू. त्याप्रमाणे देवांनी विचारल्यावर बृहस्पती त्यांना म्हणाले–

२१-२२ '(इंद्राने) रसातलामध्ये बलीचा पाडाव केल्यावर तो (इंद्र) उतथ्याच्या आश्रमाकडे गेला. धाष्टर्य करून त्याने (उतथ्याच्या) पत्नीचा भोग घेतल्यावर त्याच्या (=उतथ्याच्या) शिष्यांनी त्याची निंदा केली. स्वर्गाकडे जाण्याची लाज वाटू लागली (म्हणून) त्याने मेरू (पर्वताच्या) गुहेत प्रवेश केला. पराक्रमी (इंद्र) शचीसह तेथेच आपल्या कृत्याचे चिंतन करीत बसलेला आहे.'

२२-२४ असे (बृहस्पतीचे) भाषण ऐकून अग्निप्रमुख देव विनंती करण्यासाठी शीघ्र मेरूच्या गुहेकडे गेले. गुहेत असलेल्या देवेंद्राला पाहून लोकप्रसिद्ध असे त्याचे विविध पराक्रम (वर्णन करणाऱ्या) स्तोत्रांनी त्याला प्रसन्न केले. ते म्हणाले–

२५-२६ 'हे शचीपते! तू सर्व देवांचा अधिपती आहेस. तुला सदैव नमस्कार असो. दैत्यांचे प्रतिस्पर्धी असल्याने तू नसल्यामुळे आम्हाला खूप दुःख होत आहे. आमच्या (नेहमीच्या) स्थानापासून भ्रष्ट होऊन आम्ही अनेक देशांत खिन्न होऊन भटकत आहोत. तेव्हा देवेंद्रा, तू (परत) येऊन शत्रूंना मार. तू शत्रूंना मारणारा आहेस(च).'

२७-२८ देवांनी अशा रीतीने त्याची स्तुती केल्यावर (इंद्र) देवांबरोबर गुहेच्या तोंडातून बाहेर आला. लाजेने मुख खाली करून डोळ्यांनी तो जमिनीकडे पाहत होता. लज्जित झालेल्या इंद्राला (पाहून) देव त्याला म्हणाले–

२८-३१ 'देवाधिदेवा! शंका बाळगू नकोस. जग कर्माधीरन आहे. मानापमान, सुखदुःख, लाभालाभ, जयापजय पूर्वकर्मानेच होतात. कालपुरुष वेळोवेळी कर्माप्रमाणे जीवांना दुःख सांगतो. शहाणे लोक दुःख झाल्यावर शोक करीत नाहीत, व त्याने सुखाने आनंदही होत नाही. तेव्हा हे प्रभो, हे तुझे दुःख प्रारब्धानेच मिळालेले असल्याने तू दुःखी होऊ नकोस.

३२-३५ (बृहस्पतीने) असे सांगितल्यावर अमरावतीचा राजा (इंद्र) ब्रह्मदेवाला म्हणाला–

'हे आदरणीय (गुरो)! बल, सामर्थ्य, निष्कलंक कीर्ती, मंत्रशक्ती, शास्त्रशक्ती, विद्याशक्ती, अस्त्रशक्ती, शस्त्रशक्ती आणि देहशक्ती परस्त्रीच्या

तदा गुरुश्च तं प्राह देवेन्द्रं विद्वदुत्तमः ।।३५

बृहस्पतिर् उवाच।।

"तवोपायं वदाम्यद्य तत् त्वं कर्तुम् उहार्हसि ।
देवीं त्वं शरणं याहि भवदुःखनिवारिणीम् ।।३६
प्रतापदायिनीं वीर्यतेजोबलविधायिनीम्।
प्रतापदुर्गाम् इति च नाम्ना ख्यातां गिरीन्द्रजाम्।।३७
सह्याद्रिशिखरारूढां त्रैलोक्याभयकारिणीम्।
प्रसन्नां सेवया कृत्वा वीर्यवान् त्वं भविष्यसि" ।।३८
इति तद्गुरुवाक्येन शच्या देवैः समन्वितः
ययौ स मद्यवान् अद्रिं सह्याख्यं वेगवत्तरः ।।३९
सह्याद्रिकन्दराप्रोच्चशिखरोत्तुङ्गदुर्गमाम्।
पीतकौशेयवसनां दधानां रक्तकञ्चुकीम् ।।४०
नानालंकारशोभाढ्यां वनमालां विभूषिताम्।
हरिद्राकुङ्कुमालक्तदिव्यचन्दनचर्चिताम् ।।४१
कज्जलाङ्कितनेत्राभ्यां पुष्पजालाङ्कितालकाम्।
दृष्ट्वा प्रतापदुर्गां तां प्रणनाम पुनः पुनः ।।४२
दुर्गाकुण्डावगाहेन परस्त्रीगमनोद्भवम्।
तत् पापं विलयं यातं सद्य एवाद्भुतं महत् ।।४३

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
इन्द्रदोषकारणवर्णनं नाम षष्ठोऽध्यायः ।।६



संगदोषाने (सर्व) नष्ट झाले, असे मला वाटते. आणि सामर्थ्यहीन होऊन मी मूक झालो आहे.'

इंद्राने असे म्हटल्यावर बृहस्पतीने देवांबरोबर चर्चा केली, आणि इंद्राला पुनः बलप्राप्ती व्हावी म्हणून पंडितश्रेष्ठ गुरू बृहस्पती त्या देवेंद्राला म्हणाले–

३६-३८ बृहस्पती म्हणाले– 'मी तुला उपाय सांगतो, तू तो करावास. भवदुःखाचे निवारण करणाऱ्या, पराक्रमी बनविणाऱ्या, वीर्य-तेज बल निर्माण करणाऱ्या प्रतापदुर्गा या नावाने प्रसिद्ध असणाऱ्या पर्वतश्रेष्ठ (हिमालयाच्या) कन्येला, सह्याद्रीच्या शिखरावर असलेल्या त्या देवीला तू शरण जा. त्रैलोक्याला अभय देणाऱ्या (त्या देवीला) आपल्या सेवेने तू प्रसन्न कर म्हणजे तू पराक्रमी होशील.'

३९-४३ अशा त्या गुरूच्या भाषणावरून शची आणि देव यांना बरोबर घेऊन तो उदार इंद्र मोठ्या जलदीने सह्य पर्वताकडे गेला. सह्याद्रीच्या कंदरांच्या उच्च शिखरावरील दुर्गम, पीत वर्णाचे रेशमी वस्त्र धारण करणाऱ्या, लाल कंचुकी घातलेल्या, अनेक अलंकारांनी शोभासंपन्न, आणि वनमालाविभूषित, हरिद्रा, कुंकुम, अलात्कक आणि दिव्य चंदन चर्चिलेल्या, डोळ्यांत काजळ घातलेल्या, केसावर पुष्पांचे जाळे असलेल्या त्या प्रतापदुर्गेला पाहून (त्याने) तिला पुनः पुनः प्रणाम केला, व दुर्गाकुंडात स्नान केल्यावर त्याचा परस्त्रीगमनजन्य पाप झटक्यात नाहीसे झाले. (केवढे हे) महान् आश्चर्य !

'इंद्रदोष कारण वर्णन' नावाचा सहावा अध्याय.

दीक्षित उवाच ।
अथ शच्या सुरैर्युक्तस्तदाराधनतत्परः ।
ताम् एव चिन्तयन् नित्यं तन्मनाः संबभूव सः ।।१
एवं सदाराधयतस्तस्यासीद् वरदा रमा ।
उवाच प्रकटीभूता दुर्गा दुर्गान्तरस्थिता ।।२
श्रीप्रतापदुर्गोवाच ।
मा भेतव्यं त्वया दुष्टैर् दितिजैः सुरनायक ।
ते साहाय्यं करिष्यामि जेष्यामि दितिजान् क्षणात् ।।३
चेन् माम् अत्रैव ते यान्ति तद्यहं तैस्त्वारिभिः ।
सम्यग् युद्धं करिष्यामि ममेच्छाप्यस्ति संगरे ।।४
समाहूता मया चेद् वः शत्रवस्ते ममान्तिकम् ।
नागतास्तर्हि तान् गत्वा त्वं जेष्यसि विनिश्चयात् ।।५
इति संश्राव्य देवेन्द्रं प्रतापगिरिजा तदा ।
निजं केशरिणं प्राह गच्छ देवस्वरूपधृक् ।।६
बलिं तम् अमरावत्यां तिष्ठन्तं दैत्यसंयुतम् ।
ममादेशं वदस्वत्वं यन् मयादिश्यते तव ।।७
शरणं मां समायातस्त्वत्रेन्द्रो निर्जैरैः सह ।
तस्मै मयाभयं दत्तं तत्सहायं करोम्यहम् ।।८
भवत्सु पौरुषं चेदं हि वर्तते संगरं प्रति ।
आगन्तव्यं जवाद् अत्र मया युद्धं सुदुर्धरम् ।।९
कर्तव्यं पौरुषं नो चेद् गन्तव्यं स्वस्थलं प्रति ।
मुक्त्वा देवेन्द्रनगरं ताम् इन्द्रोऽयं प्रशास्यति ।।१०
इति देवीवचः श्रुत्वा केशरी देवरूपधृक् ।
गत्वा देवेन्द्रनगरीं बलिं दृष्ट्वा च सनसंस्थितम् ।।११
देव्युक्तं कथयामास सविस्तारं यथोदितः ।
बलिः श्रुत्वाथ तं प्राह विहस्य दितिजैः सह ।।१२
नार्याम् एवेदृशं वीर्यं कुतो नः पौरुषं गतम् ।
नारीवत् कङ्कणानीह नास्माभिर्निजसत्करे ।।१३
धारितान्यत्र वर्तन्ते गतवीर्याश्च किं वयम् ।
अधुनैवागतान् सर्वान् युद्धार्थं ब्रूहि वेगतः ।।१४
गत्वा स्वस्वामिनी वाच्या सत्यं कुरु निजाभयम् ।
यच्चेन्द्राय त्वया दत्तमविचारात् पुरैव हि ।।१५
संनद्धा भव युद्धार्थं वयं सर्वेऽधुनागताः ।
वीर्यं चेत् समरे तिष्ठ नो वीर्यं चेद् अधोमुखाः ।।१६



# ७. 'बली व दुर्गादेवी यांचे युद्धवर्णन'

दीक्षित म्हणतात– शचीसह आणि देवांना(ही) बरोबर घेऊन तो (इंद्र) त्या (प्रतापदुर्गेचेच) चिंतन करीत, सतत तन्मय होऊन तिचे आराधन करण्यात दक्ष राहिला. तो असा सतत आराधना करीत असता लक्ष्मी त्याला वर देण्यास (उद्युक्त) झाली. किल्ल्याच्या आत राहिलेली दुर्गा प्रकट होऊन म्हणाली–

३–५ प्रतापदुर्गा म्हणते– दुष्ट दैत्यांना भिऊ नकोस. हे देवांच्या राजा! मी तुला मदत करीन आणि दैत्यांना क्षणात जिंकून देईन. ते जर या ठिकाणी येतील, तर मी तुझ्या शत्रूंबरोबर लढीन. युद्ध करावे अशी माझीही इच्छा आहे. माझ्याकडे या अशी मी तुझ्या शत्रूंना चेतावणी दिली आणि ते आले नाहीत, तर त्यांच्याकडे जाऊन निश्चित त्यांना तू जिंकशील.

६–१० याप्रमाणे देवेंद्राला ऐकवून प्रतापगिरिजा आपल्या सिंहाला म्हणाली, ''देवाचे रूप धारण करून जा आणि अमरावतीत बसलेल्या त्या बलीला त्याच्या दैत्यांसमवेत माझा आदेश कळव. तो आदेश मी तुला सांगते. इंद्र इतर देवांसह मला शरण आलेला आहे. मी त्याला अभय दिले आहे. मी त्याला साहाय्य करणार आहे. तुमच्याजवळ काही पौरुष असेल तर युद्धात त्वरित यावे. माझ्याशी युद्ध टाळता येणार नाही. दाखवा आपला पराक्रम. नाहीतर आपल्या स्थानाकडे परत जा. देवेंद्राची राजधानी मुक्त करून इंद्र तेथे राज्य करणार आहे.''

११–१२ याप्रमाणे देवीचे भाषण ऐकल्यावर सिंह देवरूप घेऊन देवेंद्राच्या नगरीस गेला व तेथे बलीला पाहून त्याला सांगितल्याप्रमाणे विस्ताराने त्याने देवीचा निरोप त्याला सांगितला. तो ऐकताच दैत्यांसह बली मोठ्याने हसून म्हणाला, ''बायकांमध्येच असा उत्साह असेल तर आपल्याजवळचे पौरुष कुठे गेले? आम्ही काही बायकांप्रमाणे इथे आपल्या हातात बांगड्या भरलेल्या नाहीत. आम्ही पराक्रमहीन झालो आहोत काय? इथे आलेल्या सर्वांना आताच झटपट युद्धाला तयार राहण्यास सांग. जाऊन आपल्या मालकिणीला सांग. म्हणावे, आपले अभयवचन खरे करून दाखवावे. ते तू पूर्वीच इंद्राला विचार न करता दिले आहेस. युद्धाला सज्ज व्हा. आम्ही सर्व आलो आहोत. (अंगात) पराक्रम असेल तर युद्ध करायला या. तो नसेल तर मान खाली करा. रहा नाही कुठे (ही) सह्याद्री (पर्वत) सोडून जा. तुझ्यापुढे आता आम्ही पाठ (दाखविणार) नाही.

तिष्ठ वान्यत्र याहि त्वं मुक्त्वा सह्याद्रिपर्वतम्।
नास्माभिर्गमनं पृष्ठे तवाग्रे क्रियतेऽधुना ।।१७
सह्यान्तम्एव यास्यामो वयं नाग्रे व्रजामहे।
इति तद् गर्वसंयुक्तं बलिवाक्यं सुनिष्ठुरम् ।।१८
श्रुत्वासौ केशरी स्वर्गाद् आगतः सह्यपर्वतम्।
बलिवाक्यं सविस्तारं कथयामास पार्वतीम् ।।१९
तच्छ्रुत्वा पार्वती क्रुद्धा प्रजज्वाल भयानका।
संनद्धाऽभूद् रणं कर्तुं बलिमार्गं व्यलोकयत् ।।२०
तावद् बलिः समायातो दितिजैः सह मर्षितः।
सेनया चतुरङ्गिण्या शतसाहस्रसंख्यया ।।२१
तद्दुर्गं वेष्टयन् स्वीयं सेनावासं चकार सः।
वादयामास वाद्यानि गजवाजिरथोपरि ।।२२
रुरुधुर् दितिजाः सर्वे दुर्गद्वारं सहस्रशः।
तद् दृष्ट्वा गिरिजा क्रुद्धा केशरीस्कन्धसंस्थिता ।।२३
शस्त्रास्त्रधारिणी दुर्गाद् बहिर् निर्गत्य सा ययौ।
टणत्कृत्य महत् चापं चकार कदनं महत् ।।२४
संस्थाप्येन्द्रं दुर्गमध्ये देवैः सह निजालये।
शतकोटीः स्वीयमूर्तीश्चकारेयं रणाजिरे ।।२५
ता देव्यः सकलं सैन्यं रोधयन्त्यः स्थितास्तदा।
समन्ततो देवताभिर् व्याप्तम्आसीद् दिगन्तरम् ।।२६
ततस्ताः सिंहनादं चक्रुर् दीर्घस्वरेण हि।
तेन नादेन महता चुक्षुभुः सप्त सागराः ।।२७
चकम्पे धरणी देवी तारा(:) पेतुर् धरातले।
ता दृष्ट्वाथ बलिश्चापि दितिजैः परिवारितः ।।२८
चकार समरं देव्या अस्त्रैः शस्त्रैर् भयावहम्।
तोमरैर मुसलैर् अस्त्रैः शतघ्नीभिः शरैरपि ।।२९
कुन्तैः खड्गैर् गदाभिश्च प्राशैः शूलैर् भुशुण्डिभिः।
आच्छादयन्तो गगनं दैतेया युयुधुस्तदा ।।३०
देव्यश्चापि त्रिशूलैश्च प्राशैः कुन्तैः परश्वधैः।
भिण्डिमालैश्च खट्वाङ्गैः परिघैर् असिभिः शरैः ।।३१
युयुधुर् दितिजैः साकं महाकाया महाबलाः।
तदा देवी शरैस्तीक्ष्णैर् आदित्यकरसंनिभैः ।।३२
बलेः सारथिनं साश्वं जघान लीलया क्षणात्।
बलिश्च विरथी वेगाद् गदाम् उद्यम्य वीर्यवान् ।।३३



सह्याद्रीपर्यंतच आम्ही येऊ, त्यापुढे जाणार नाही.''

१८-२० असे त्या बलीचे गर्वयुक्त व कठोर भाषण ऐकून सिंह स्वर्गातून सह्यपर्वताकडे आला, (आणि त्याने) बलीचा प्रतिसाद सविस्तर दुर्गेला निवेदन केला. ते ऐकून दुर्गा रागाने भय निर्माण करीत आग ओकू लागली. ती युद्ध करण्यास तयार होऊन बलीच्या मार्गाकडे पाहू लागली.

२१-२३ तेवढ्यात रागावलेला बली दैत्यांसह तेथे पोचला. त्याने आपल्या एक लक्ष संख्या असलेल्या चतुरंग सैन्याचा किल्ल्याला वेढा देऊन आपल्या सैन्याची छावणी बनविली. हत्ती, घोडे, रथ यावर वाद्ये वाजू लागली. सर्व बाजूंनी त्यांनी किल्ल्याचा दरवाजा अडविला.

२३-३० ते पाहून सिंहाच्या (खांद्यावर) बसलेली दुर्गाही क्रुद्ध होऊन शस्त्रास्त्रे धारण करीत किल्ल्यातून बाहेर निघून आली. धनुष्याचा मोठा टणत्कार करीत तिने मोठीच कत्तल सुरू केली. देवांसह इंद्राला किल्यात(च) आपल्या निवासस्थानी ठेवून तिने शंभर कोटी स्वतःच्या प्रतिमा रणांगणावर निर्माण केल्या. त्या (प्रतिमारूप) देवता सगळ्या सैन्याला अडवून उभ्या राहिल्या. सर्व दिशा सर्व बाजूंनी त्या देवतांनी व्याप्त झाल्या. त्यांनी उच्च स्वरात सिंहनाद आरंभिला. त्या मोठ्या आवाजाने सप्तसागर खवळले. पृथ्वीदेवी (थरथर) कापू लागली. भूमीवर तारका कोसळू लागल्या. त्या (देवतांना) पाहून दैत्यांच्या परिवारासह बलीनेही देवीबरोबर युद्ध आरंभिले. भयानक शस्त्रास्त्रे, लोखंडी गदा, मुसळे, शतघ्नी, बाण, भाले, खड्ग, प्रास, शूल, भृशुंडी, या (आयुधांनी) दैत्यांनी आकाश आच्छादून टाकले, व युद्ध करीत राहिले.

३१- देवतादेखील त्रिशूल, प्रास, भाले, परशू, भिण्डिमाल, खट्वांग, परिघ, तलवारी, बाण या (साधनांनी) दैत्यांबरोबर महाकाय आणि महाबल अशा रूपात लढू लागले. तेव्हा देवीने सूर्यकिरणांसारख्या तीक्ष्ण बाणांनी बलीच्या सारथीला अश्वांसह क्षणात सहज मारले. रथ (उपयोगाचा) न राहिल्यामुळे पराक्रमी बली गदा उचलून त्वरित धावत आला (आणि) देवीला म्हणाला, 'तू इंद्राला एकांतात संरक्षण देऊन ठेवले आहेस. या युद्धभूमीच्या किल्ल्यावर (त्याला) साहाय्य करण्याच्या इच्छेने त्या देवराजाला जे अभय दिलेस ते आता खरे करून दाखव. मी त्या इथेच गदेने तुला मारून त्या इंद्राला(ही) मारतो. जर जगण्याची इच्छा असेल तर दोघेही दूर निघून जा.' असे बोलत त्या रणात हसतच गदा उचलतो

दुद्राव देवीं प्रोवाच त्वयेन्द्रो गोपितो रहः।
मया युद्धं गिरौ अस्मिन् साहाय्यं कर्तुकामया ।।३४
आरब्धम् अस्ति दत्वा तम् अभयं सुरनायकम् ।
तत् सत्यं कुरु देवेन्द्रं यद् दत्तम् अभयं पुरा ।।३५
हत्वा त्वां गदया चात्र देवेन्द्रं तं निहन्म्यहम् ।
यदि ते जीवितुं वाञ्छा तर्हि तौ व्रज दूरतः ।।३६
इति ब्रुवन् जघानोच्चां तां गदां प्रहसन् रणे।
तावद् देव्या निजैर् बाणैः शतधा खण्डिता गदा।
निपातिता क्षणाद् एव पश्यता बलिना भुवि ।।३७
तद् अद्भुततरं दृष्ट्वा बलिर्विस्मयम् आगतः।
पुनः खड्गं महत् तीक्ष्णं धृत्वा देवीं प्रदुद्रुवे ।।३८
तावद् देव्या शरैः स्वीयैस्तं छित्वा खड्गम् उत्तमम्।
पुनर्बलिं क्रोशमात्रं नीत्वा त्यक्तो रणाजिरात् ।।३९
तं दृष्ट्वापहतं देव्या चक्रुर् दैत्याः पलायनम्।
तदातिचकितश्चासीद् बलिर् मेने शिवां वराम् ।।४०
पुनर् धैर्यं समालम्ब्य दैत्यान् धिकृत्य तैर्युतः।
बलिर्ययौ रणभुवं किंचिन् म्लानमुखो जवात् ।।४१

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
बलिदुर्गयोर् युद्धवर्णनं नाम सप्तमोध्यायः ।।७



तोच देवीने आपल्या बाणांनी त्या गदेचे शेकडो तुकडे केले. बलीच्या देखत क्षणात ती (गदा) जमिनीवर पाडली. ते अतिशय अद्भुत दृश्य पाहून बलीला आश्चर्य वाटले. अत्यंत तीक्ष्ण असे खड्ग (हातात) घेऊन तो पुनः देवीवर धावून गेला. तेवढ्यात देवीने आपल्या बाणांनी ते जबरदस्त खड्ग तोडून (टाकले), (आणि) त्या बलीला(ही) एक कोसभर (फरफटत) नेऊन रणांगणावरून बाजूला सारले. देवीने त्याला पुनः पळवून लावलेले पाहून दैत्यांनी पलायन केले. तेव्हा बली अत्यंत आश्चर्यचकित होऊन दुर्गेला श्रेष्ठ मानू लागला, (आणि) पुनः धैर्य एकवटून दैत्यांचा धिक्कार करून त्यांच्यासह लगेच किंचित म्लान मुखाने रणभूमीकडे गेला.

'बली व दुर्गादेवी यांचे युद्धवर्णन' नावाचा सातवा अध्याय.

दीक्षित उवाच।

पुनर्बलिं समायातं दृष्ट्वा देवी गिरीन्द्रजा ।
ओत्वस्त्रं दैत्यवर्यं तं ससृजे मुदितानना ।।१
सारमेयास्त्रम् उत्सृज्य बलिना समराङ्गणे ।
निवारितं बिडालास्त्रं वह्न्यस्त्रं ससृजे शिवा ।।२
बलिर् मुमोच मेघास्त्रं तेनाग्न्यस्त्रं न्यवारयत् ।
प्रतापदुर्गावाय्वस्त्रान् मेघास्त्रं तं न्यवारयत् ।।३
पर्वतास्त्रेण वाय्वस्त्रं बलिना तन् निरोधितम् ।
ततो देवी मुमोचान्यत् सर्पास्त्रं बलिनं रुषा ।।४
गारुडास्त्रं विसृज्यासौ बलिः सर्पं न्यवारयत् ।
एवं तत् तुमुलं युद्धं बभूव दिनसप्तकम् ।।५
तदा प्रतापदुर्गा सा चण्डिकास्त्रेण तं रिपुम् ।
हन्तुकामा महास्त्रं तन् मुमोच बलिनं रुषा ।।६
असंख्याताश्च ता देव्यः प्रधावन्त्य इतस्ततः ।
तत् सैन्यं भक्षयामासुश्चतुर्थांशावशेषितम् ।।७
चण्डिकास्त्रं समायातं दृष्ट्वा दैत्यो बलिस्तदा ।
अजानत् तत्प्रतीकारं तन् निवारयितुम् अक्षमः ।।८
शम्बरादिमहावीरैः पलायनपरोऽभवत् ।
ज्ञात्वा बलं विशेषेण दुर्गाया निजमानसे ।।९
जगाम स्वर्गलोकं तं विवेशाथामरावतीम् ।
पलायमानं तं दृष्ट्वा प्रतापाख्या वराम्बिका ।।१०
तुतोष नितरां भद्रा नैजं दुर्गं न्यवर्तत ।
देवीदेहे लयं सर्वास्ताः प्रापुर्देवतास्तदा ।।११
विवेश दुर्गं देवी सा तामिन्द्रोऽसौ ददर्श ह ।
प्रणेमुस्तां सुरेन्द्रेण स शच्या निर्जरादयः ।।१२
तदेन्द्रं गिरिजा प्राह "बलिर् मत्तः पलायितः ।
गच्छ त्वं निर्जरैः सर्वैस्तेन युध्यस्व मद्गिरा ।।१३
अहं त्वद्बाहुयुगुले प्रविशामि विनिश्चयात् ।
त्वया संहारयिष्यामि त्वद्रिपून् अखिलान् इह ।।१४
मत्प्रतापबलाद् एव रिपून् संहारयिष्यसि ।
त्वम् एव क्षणमात्रेण गच्छ शीघ्रं सुरेश्वर ।।१५
मत्तीर्थस्नानपानाभ्यां परस्त्रीसंगसंभवम् ।
त्वत्पापं विलयं यातं तथान्यद् यत् पुरार्जितम् ।।१६
यशोबलादिकं सर्वं यद्यन् नष्टं तवाघतः ।
तत् तत् सर्वं यथापूर्वं भविष्यति गिरा मम ।।१७



## ८. 'इंद्रविजय'

१-९ दीक्षित म्हणतात- दुर्गा देवीने बलीला पुनः येताना पाहून हर्षाने त्या दैत्यश्रेष्ठाकठे ओत्वस्त्र सोडले. बलीने रणांगणावर सारमेयास्त्र टाकून बिडालास्त्रा-पासून निवारण केले. दुर्गेने अग्न्यस्त्र निर्मिले तेव्हा बलीने मेघास्त्र फेकले व त्या (मेघास्त्राच्या) साधनाने अग्न्यस्त्राचे निवारण केले. प्रतापदुर्गेने वाय्वस्त्र (योजून) त्या मेघास्त्राला प्रतिबंध केला. त्या वाय्वस्त्राची बलीने पर्वतास्त्राच्या साहाय्याने अडवणूक केली. तेव्हा क्रोधाने देवीने बलीवर दुसरे एक (?) सर्पास्त्र टाकले. बलीने गरुडास्त्र टाकून सर्पास्त्राचा विरोध केला. अशा रीतीने ते तुंबळ युद्ध सात दिवसांपर्यंत चालले. प्रतापदुर्गा चण्डिकास्त्राने आपल्या शत्रूला मारू इच्छित होती, क्रोधाने बलीवर महास्त्र टाकले. ती असंख्य देवीची (रूपे) इकडे-तिकडे धावत राहून त्यांनी ते सैन्य चतुर्थांशापर्यंत(च) शिल्लक ठेवले. बली दैत्य चंडिकास्त्र आपल्यावर येत आहे असे पाहून त्याचा प्रतिकार कसा करावा हे समजत नसल्यामुळे त्यावर उपाय करण्यास असमर्थ झाला, व शंभरादी महावीरांसह पळून जाण्यास उद्युक्त झाला.

९-११ दुर्गेचे विशेष प्रकारचे सामर्थ्य त्याच्या मनात आल्याने तो स्वर्गलोकाकडे वळला व त्याने अमरावतीत प्रवेश केला. तो पळत असलेला पाहून ती श्रेष्ठ प्रतापाम्बिका कल्याणप्रद असल्याने संतुष्ट होऊन आपल्या किल्ल्यात परत गेली, (आणि) ती सर्व देवीची रूपे देवीच्या देहात (पुनः) मिळून गेली.

१२-१३ किल्ल्यात प्रवेश करताना इंद्राने तिला पाहिले. सर्व देवांनी व शचीसह सुरेंद्राने तिला वंदन केले. तेव्हा दुर्गा इंद्राला म्हणाली-

१३-१६ "उन्मत्त झालेला बली पळून गेला आहे. तू आता सर्व देवांना (बरोबर) घेऊन त्याच्याशी युद्ध कर असे मी म्हणते. मी तुझ्या दोनही बाहूंमध्ये खचितच प्रवेश केलेला असेल. तुझ्याकडूनच मी तुझ्या सर्व शत्रूंचा संहार करणार आहे. माझ्या प्रतापाच्या जोरावर तू शत्रूंचा संहार करणार आहेस. (तेव्हा) हे देवेंद्रा! तू या क्षणालाच त्वरेने (परत) जा. माझ्या तीर्थात स्नान करून पाणी प्यालावर परस्त्रीच्या संगतीतून उद्भवलेले आणि इतर(ही) प्राप्त झालेली तुझी पापे लयाला गेली आहेत.

१७-२२ यश, बल आणि सर्व काही जे जे काही तुझ्या पापामुळे नष्ट झाले आहे, ते ते सर्व माझ्या आशीर्वादाने पूर्वीसारखे होईल. यापुढे तुला सर्वदा युद्धात विजय मिळत जाईल. माझे, प्रतापदुर्गेचे तू रणांगणावर सतत चिंतन कर. माझ्या

विजयं सर्वदा युद्धे प्राप्नोषि त्वम् अतः परम्।
माम् एव चिन्तयस्व त्वं प्रतापाख्यां रणाजिरे ।।१८
मम चिन्तनमात्रेण जय एव विनिश्चयात्।
रणकाले वादकाले व्याघ्रचोरभये तथा ।।१९
दावाग्निना दह्यमाने स्वीयै राष्ट्राद् बहिःकृते।
दुःस्वप्ने देवताकोपे पितृकोपेऽथ मज्जिते ।।२०
गुरुकोपे स्वामिकोपे विप्रकोपेऽतिसंकटे।
दैवप्रतिहतेऽप्यत्र मानवैर् मां सदा स्मरेत् ।।२१
मम स्मरणमात्रेण सर्वत्र विजयी भवेत्।''
इति देवीवचः श्रुत्वा देवेन्द्रो निर्मलाशयः ।।२२
शच्या देवैर् युतो नाकं प्रययौ गजसंस्थितः।
ततो हताशुभः शक्रो राहोर् मुक्त इवोडुपः ।।२३
देवसंघचमूमध्ये शुशुभेऽसौ हरिर् यथा।
पश्चाद् देवः समायुक्तो विनिर्जित्य तदासुरान् ।।२४
प्रतापदेवीवरतः प्रविवेशामरावतीम्।
शङ्खतूर्यनिनादेन नानोत्सवपुरःसरम् ।।२५
बलिश्च दैत्यवृन्देन भयात् पातालम् आययौ।
इन्द्रोऽसौ अमरावत्याम् अकरोद् राज्यम् उत्तमम् ।।२६
अनुज्ञाताश्च शक्रेण स्वधामानि ययुः सुराः।
ततस्ते यज्ञभागांश्च लेभिरे स्वान् यथा पुरा ।।२७
पिण्डभागांश्च पितरो यथापूर्वं प्रपेदिरे।
स्वाध्यायैर्मुनयस्तुष्टा दैत्यानां च पराजये ।।२८
य इदं श्रुणुयाद् वापि श्रावयेद् वा समाहितः।
तौ उभौ पापनिर्मुक्तौ यास्यतः परमां गतिम् ।।२९
इत्येतत् कथितं राज्ञि पुण्याख्यानम् अनुत्तमम्।
सर्वपापप्रशमनं सर्वसौख्यप्रदायकम् ।।३०
एवं प्रतापदेवी सा सर्वेषां कार्यसाधिनी।
बहुभिः सेविता सिद्ध्यै सर्वत्र जगतीतले ।।३१
नास्माभिः श्रूयते क्वापि सिद्धिहीनो नरः क्वचित्।
प्रतापदुर्गापुरतो गतश्चेत्यवनीतले ।।३२
तस्मान् सर्वैः सदा सेव्या स्वस्वकार्यप्रसिद्धये।
प्रतापदुर्गा श्रेष्ठात्र सर्ववाञ्छितदायिनी ।।३३

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
इन्द्रविजयो नाम अष्टमोऽध्यायः ।।८



केवळ चिंतनाने निश्चित जयच (मिळेल). युद्धकाली, वादविवादात, वाघ-चोरांपासून भय निर्माण निर्माण होईल. तेव्हा, वणव्यामुळे भाजू लागल्यावर स्वतःच्या राष्ट्रातून हाकलले गेल्यावर, दुःस्वप्न पडले असेल तेव्हा, देवता-पितर यांचा कोप झाला असता, पापात बुडाल्यावर, गुरूचा-स्वामीचा, ब्राह्मणाचा कोप झाल्यास, मोठे संकट प्राप्त झाल्यास, (आणि) दैव विरुद्ध जाऊ लागल्यास मानवांनी माझे स्मरण करावे. माझे नुसते स्मरण केले तर ते सर्वत्र विजयी होतील.''

२२-२५ देवीचे भाषण ऐकून देवेंद्राचे मन निर्मळ झाले, (आणि तो) देवांबरोबर शचीसह हत्तीवर बसून स्वर्गास गेला. तेव्हा तो शुभकारक, इंद्र, राहूपासून चंद्र मुक्त व्हावा त्याप्रमाणे झाला. विष्णूप्रमाणे तो देवांच्या सैन्यात शोभू लागला. असुरांना मारून तो पुनः देवत्व पावला. प्रतापदेवीच्या वराने (त्याने) अमरावतीत शंख आणि तुताऱ्या यांच्या निनादात अनेक उत्सवांना प्रेरणा देत प्रवेश केला. बली (देखील) भिऊन दैत्यांसह पाताळात गेला. इंद्राने अमरावतीत उत्तम राज्य केले. त्याच्या अनुमोदनाने देव(ही) आपापल्या स्थळी परतले, तेव्हा पूर्वीप्रमाणे त्यांना यज्ञातील (आहुतींचा) स्वतःचा अंश मिळू लागला, आणि पितरांनाही पूर्वीप्रमाणे पिंड मिळू लागले. स्वाध्यामुळे मुनी दैत्यांचा पराभव झाल्यावर संतुष्ट झाले.

२९ एकाग्र होऊन जो कोणी हे (आख्यान) श्रवण करील किंवा (इतरांनाही) ऐकवील ते दोघेही पापनिर्मुक्त होऊन परम गतीला प्राप्त होतील. याप्रमाणे हे उत्तम व पुण्यप्रद, सर्व पापांचा नाश करणारे (आणि) सर्व सुखे प्रदान करणारे आख्यान राणीसाहेबांना कथन केले आहे.

अशा रीतीने प्रतापदेवी सर्वांचे कार्य साधून देत असल्याने सर्व पृथ्वीवर यशासाठी तिची आराधना अनेकांनी केली आहे. प्रतापदुर्गेपुढे गेला आणि त्याला सिद्धी मिळाली नाही असा मनुष्य आम्ही(तरी) या पृथ्वीवर आमच्या कानावर आलेला नाही. म्हणून श्रेष्ठ आणि सर्वांचे इच्छित देणाऱ्या प्रतापदुर्गेची आराधना आपापल्या कार्याला यश मिळावे म्हणून सर्वांनी नेहमीच करावी.

'इंद्रविजय' नावाचा आठवा अध्याय.

दीक्षित उवाच।
प्रतापदुर्गेत्यभिधा किमर्थम् इह कीर्तिता।
अस्या देव्याः शृणुष्वास्य कारणं यन् मयोच्यते ॥१
प्रतापवीर्यो नाम्नात्र दैत्यः पातालनिर्गतः।
भागिनेयो बलेश्चासौ बलेर्युद्धात् पुरैवाहि ॥२
पृथिव्यां तपसा कृत्वा विधिं तं वरदोन्मुखं।
याचयामास ब्रह्माणम् अमरत्वं सुदुर्लभम् ॥३
तम्उवाच तदा ब्रह्मा "यज्जातं नश्यतेऽत्र तत्।
यत् किंचिन् मरणे हेतुं वद मां दैत्यपुंगव ॥४
यस्मात् ते मरणे शङ्का न भविष्यति निश्चयात्।"
इति तद्वाक्यम् आकर्ण्य प्रत्युवाच विधिं पुनः ॥५
क्षणं समन्त्र्य हृदये निश्चयेनासुरस्तदा।
"नार्या मे मरणं चास्तु तृणरूपास्ति सा मम" ॥६
तथेति विधिना चोक्तं 'नार्या तेऽत्र मृतिर्भवेत्'।
अन्तर्धानम् अगाद् ब्रह्मा दैत्यो मत्तः क्षितौ इह ॥७
परिबभ्राम दितिजैः कवरेणातिगर्वितः।
एकदा मृगयां कर्तुं विराटनगरान्तिके ॥८
किंचित्सैन्ययुतः प्रागात् कृष्णावेण्योः शुभेऽन्तरे।
तत्र दृष्ट्वा महत् श्रेष्ठं मृगं तं हन्तुं उद्यतः ॥९
चकार शरसन्धानं तद्भीत्यासौ पलायितः।
तत्पृष्ठे दैत्यवर्योऽपि व्रजन् वेगेन वाजिगः ॥१०
बहु दूरं गतश्चासौ न मृगं हतवान् वने।
सह्याद्रिकन्दरायां च मृगपृष्ठेऽसुरो ययौ ॥११
तत्रादृष्ट्वा मृगं क्वापि भयाल् लीनं वनान्तरे।
प्रतापदुर्गशिखरे ददर्शासौ गिरीन्द्रजाम् ॥१२
तप्तकाञ्चनसंकाशां वरनूपुरभूषिताम्।
चन्द्रास्यां रक्तवसनां महार्हाभरणैर् युताम् ॥१३
तां दृष्ट्वा विकलो दैत्यः कामबाणप्रपीडितः।
तां धर्तुं वेगवान् यातस्त्वरा देवी चुकोप सा ॥१४
निष्कास्य भूषणं कर्णात् चक्राकारमनोहरम्।
प्राक्षिपद् दैत्यवर्यं तं लीलया जगदम्बिका ॥१५
पपात हृदये तस्य तद् देव्या वरभूषणम्।
वज्रवत् ताडितस्तेन पपात रुधिरं वमन् ॥१६
तदोवाच वचो दीनं "वृथा मां हतवान् असि।
तव दर्शनतः कामवह्निना पीडितस्त्वहम् ॥१७



## ९. 'प्रतापवीर्यवध'

१-७ दीक्षित म्हणतात- प्रतापदुर्गा असे या देवीचे नाव कसे काय प्रसिद्ध झाले? याचे कारण मी सांगतो, ते ऐका. प्रतापवीर्य या नावाचा एक दैत्य पाताळातून (वर) आला. तो बलीच्या बहिणीचा मुलगा. बलीच्या युद्धापूर्वीच त्याने पृथ्वीवर तपश्चर्या करून, (त्यायोगे) वर देण्यास उद्युक्त झालेल्या ब्रह्मदेवांना दुर्लभ असे अमरत्व मागितले. तेव्हा ब्रह्मदेव त्याला म्हणाले, "जे जन्माला येते ते नाश पावणार. तेव्हा हे श्रेष्ठ दैत्या, तू फक्त आपल्या मरणाला कारण काय चालेल हे सांग. त्यामुळे (रोजच्या जीवनात) तुला मरणाविषयी शंका उरणार नाही." हे ब्रह्मवाक्य ऐकल्यावर (प्रतापवीर्य) दैत्याने मनात थोडा विचार करून निश्चय होताच ब्रह्मदेवाला उत्तर दिले, "मी स्त्रीला तृणाप्रमाणे (तुच्छ) मानतो, तेव्हा एखाद्या स्त्रीच्या हातून मरण आलेले मला चालेल." 'तथास्तु' असे म्हणून स्त्रीकडून तुझा मृत्यू होईल असे ब्रह्मदेव म्हणाले, व अंतर्धान पावले. इकडे (प्रतापवीर्य) दैत्य पृथ्वीवर उन्मत्त झाला.

८-१२ ब्रह्मदेवाच्या वराने गर्व चढून तो दैत्यांबरोबर (इतस्ततः) फिरू लागला. एकदा तो विराटनगराजवळ शिकार करण्यासाठी थोडेसे(च) सैन्य घेऊन कृष्णा-वेण्णा नद्यांच्या पावन तीरावर आला. तेथे त्याला एक मोठे हरिण दिसल्यावर त्याला मारण्यासाठी तो सज्ज झाला. शरसंधान केले तेव्हा त्याच्या भीतीने हरिण पळू लागले. मागोमाग दैत्यवर्यही वेगाने घोड्यावर बसून जात असता पुष्कळ अंतर कापले; परंतु जंगलात हरिण मारता आले नाही. दैत्य हरणाच्या पाठीमागे (धावत-धावत) सह्याद्रीच्या गुहेत पोचला. परंतु तेथे भीतीने जंगलात लपलेले हरिण दिसले नाही; परंतु प्रतापदुर्गाच्या शिखरावर दुर्गेचे दर्शन झाले.

१३-१५ तप्त सुवर्णाप्रमाणे चमकणाऱ्या, उत्तम नूपुरांनी शोभणाऱ्या, चंद्राप्रमाणे आल्हादकारक मुख असलेल्या, लाल वस्त्र परिधान केलेल्या, आणि उंची अलंकार घातलेल्या तिला पाहताच दैत्य कामबाणाने विद्ध होऊन अस्वस्थ झाला. झटक्यात तिला पकडू पाहताच देवी (अतिशय) क्रुद्ध झाली, व त्या जगदंबिकेने चक्राकार असे आपले कर्णभूषण काढून सहजपणे त्या दैत्याकडे फेकले.

रत्यर्थं धर्तुम् उद्युक्तो नाहं त्वां हन्तुम् उद्यतः ।
त्वयि शस्त्रं न चोत्सृष्टं किं मया तेऽपराधितम् ।।१८
कथं त्वं गुप्तरूपात्र न जातासि सुमध्यमे ।
केयं त्वं प्राणघातार्थं विधिना निर्मितासि मे ।।१९
स्वल्पापराधेऽतितरो त्वया दण्डः कृतस्त्वयम् ।
न मया स्पर्शितं तेऽङ्गं न त्वां शस्त्रं मयोज्झितम् ।।२०
नापराद्धं मया तेऽद्य न त्वां धर्षितवान् अहम् ।
किं कृतं मन्त्रयस्वैतत् स्वकृतं निजचेतसि ।।२१
यादृशश्चापराधोऽत्र तादृशो दण्ड ईर्यते ।
वृथेदं मरणं मेऽत्र त्वद्धेतोर् जातम् अद्य हि'' ।।२२
इति तद्वाक्यम् आकर्ण्य गिरिजा प्राह तं रिपुम् ।
''त्वम् उन्मत्तो यथाकामान् मां यातोऽसि तथा पुनः ।।२३
ऋषिपत्नीर् वने दृष्ट्वा समायास्यसि मूढधीः ।
अतस्त्वां पापिनं क्रूरं परस्त्रीधर्षणोद्यतम् ।।२४
ताडितं लीलया कर्णभूषणेनाद्य वेगतः ।
स्वल्पापराधेऽतितरः कृतो दण्डस्त्वयेरितम् ।।२५
तस्मात् त्वां वरदा चाहं वरं वरय काङ्क्षितम् ।
मच्छस्त्रपाते भिन्नाङ्गं नाहं जीवयितुं क्षमा ।।२६
कथं मच्छस्त्रपातोऽत्र वृथैवाद्य भविष्यति ।''
इति तद्वचनं श्रुत्वा ज्ञात्वा तां वरदोन्मुखाम् ।।२७
निजकीर्तिर् मर्त्यलोके भवत्वग्रे धियेत्यसौ ।
याचयामास तां देवीं 'वरम् एनं वदाम्यहम् ।।२८
ददासि चेद् वरं मह्यं गिरिजे वरदोन्मुखे ।
येन मेऽग्रे जनान् भूम्यां स्मरणं हि भविष्यति ।।२९
तथा त्वया वरो देयस्त्विति मेन्तर्गतं शिवे ।
इति दैत्यवचः श्रुत्वा गिरिजा वाक्यम् अब्रवीत् ।।३०

दुर्गोवाच ।

''त्वत्कीर्त्यै जगतीमध्ये वदाम्यद्य वरोत्तमम् ।
तं श्रृणुष्व दैत्यवर्य येन कीर्तिर् भवेत् तव ।।३१
प्रतापवीर्य त्विति ते यन् नामास्त्यसुरेश्वर ।
अहं तद् धारयिष्यामि मन्नामादौ तवाभिधाम् ।।३२
प्रतापदुर्गा त्विति मे नामाग्रेऽस्त्वत्र निश्चयात् ।
मन्नामोच्चरणाद् एव स्मरणं ते जनान् इह ।।३३
भविष्यति सदाग्रे हि चिरकालं न संशयः ।''
इति देवीवचः श्रुत्वा तुष्टचित्तस्तदासुरः ।।३४



१६-२२ देवीचे ते उत्तम (कर्ण-)भूषण त्याच्या हृदयावर आदळले. वज्राप्रमाणे ताडन झाल्यावर तो रक्त ओकीत( भूमीवर) पडला. तेव्हा तो दीनपणे म्हणाला, ''मला तू व्यर्थ मारलेस, तुझ्या दर्शनाने मी कामाग्नीने पीडित झालो आहे. मी तुला पकडण्यासाठी सज्ज झालो ते तुला मारण्यासाठी नव्हे, तर रतिक्रीडेसाठी- मी तुझ्यावर शस्त्र उचलले नाही, तेव्हा माझा अपराध काय? तू याठिकाणी गुप्त का झाली नाहीस? माझ्या प्राणघातासाठीच ब्रह्मदेवाने तुला (अशी कशी) निर्माण केली? अत्यंत स्वल्प अपराधासाठी तू अतिशय कठोर शिक्षा देत आहेस. मी तुझ्या शरीराला स्पर्शही केलेला नाही, आणि तुझ्यावर शस्त्रही टाकलेले नाही. मी तुझा अपराधच केलेला नाही, आणि अत्याचारही केलेला नाही. मी काय (चुकीचे) केले, व तू असे केलेस याचा तू तुझ्या मनात विचार कर. जसा अपराध असेल त्याप्रमाणे दंड द्यावा असे सांगितले आहे. माझे हे मरण आज व्यर्थ तुझ्यामुळेच होत आहे.''

२३-२७ असे त्याचे भाषण ऐकून दुर्गा आपल्या शत्रूला म्हणाली, ''तू उन्मत्त होऊन स्वैरपणे (वागत आहेस). माझ्यावरही चालून आलास. हे मूर्खा, तू वनात ऋषिपत्नींना पाहून त्यांच्यावरही धावून जाशील. म्हणून मी वेगाने (वेळ न घालवता) क्रूर आणि पापी, व परस्त्रीवर अत्याचार करण्यास धजणाऱ्या तुजवर माझे कर्णभूषण (फेकून) मारले. तू म्हणतोस, अल्प अपराधासाठी अतिशय क्रूर दंड केला. तेव्हा मी तुला वर देऊ (इच्छिते). मनातील इश्चित माग. माझ्या शस्त्राचा आघात झाल्यावर तुझे शरीर छिन्नभिन्न (होईल). मी तुला पुनः जिवंत करू शकणार नाही. माझ्या शरीराचा आघात आताच कसा व्यर्थ होईल?''

२७-३० असे तिचे भाषण ऐकताच वर देण्यास ती तयार झाली असे जाणून आपली कीर्ती मर्त्यलोकात यापुढेही राहो अशा विचाराने तो देवीला म्हणाला, ''मी हा वर मागतो. तू देत असशील, हे शिवे वरदोन्मुख दुर्गे, माझे लोकांना पृथ्वीवर (पुढेही) स्मरण राहील असा वर दे, असे माझ्या मनात आहे.'' असे दैत्याचे उत्तर ऐकून दुर्गा म्हणाली-

३१-३३ ''जगामध्ये तुझी कीर्ती होईल असा उत्तम वर मी सांगते, तो ऐक. हे श्रेष्ठ दैत्या! तुझी कीर्ती होईल यासाठी तुझे जे प्रतापवीर्य असे नाव आहे ते मी माझ्या नावाच्या आधी धारण करीन. माझे नाव यापुढे सदैव प्रतापदुर्गा असे असेल. माझ्या नावाच्या उच्चारानेच चिरकाल लोकांना तुझे स्मरण होईल.''

प्रतापदेवीपुरतः क्षणात् प्राणान् मुमोच सः।
देवीहस्तान् मृतिं लब्ध्वा जगामासौ सुरालयम्।।३५
तदारभ्य भवन्नाम प्रतापगिरिजेति च।
अतः प्रतापदुर्गेति नाम्ना ख्यातास्ति भूतले।।३६
इति तत् कारणं सर्वं तवाद्य विनिवेदितम्।
अस्य श्रवणमात्रेण प्रतापाख्या प्रसीदति।।३७

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
प्रतापवीर्यवधो नाम नवमोऽध्यायः।।९



३३-३७ असे देवीचे भाषण ऐकल्यावर दैत्य (प्रतापवीर्य) संतुष्ट झाला व त्याने क्षणातच प्रतापदेवीपुढे प्राण सोडले. देवीच्याचकडून मरण पावल्यामुळे तो स्वर्गाला गेला. तेव्हापासून देवीचे नाव प्रतापगिरिजा (आणि) प्रतापदुर्गा या नावाने पृथ्वीवर प्रसिद्ध झाले.

असे हे कारण मी आपणास सविस्तर निवेदन केले आहे. या (आख्यानाचे) श्रवण करताच प्रतापदुर्गा प्रसन्न होते.

'प्रतापवीर्यवध' नावाचा नववा अध्याय.

सुकुमारोवाच।

शृणु दीक्षित मद्वाक्यं जरण्डात्र त्वया पुरा।
कृष्णावेण्योः संगमे यः प्रोक्तः प्रोत्तुङ्गपर्वतः ।।१
कुतः केन समानीतः कदा को महिमास्य हि।
तत् सर्वं विस्तरेणाद्य कथयस्व ममाग्रतः ।।२
इति राज्ञीवचः श्रुत्वा दीक्षितश्च सदाव्रती।
अब्रवीन् मधुरं वाक्यं सुकुमाराग्रतः सुधीः ।।३

दीक्षित उवाच।

सम्यक् पृष्टं त्वया राज्ञि शृणु सर्वं वदामि ते।
जरण्डामहिमानं तच्छ्रवणात् पातकापहम् ।।४
लङ्कायां लक्ष्मणः पूर्वं रावणेन रणाङ्गणे।
शक्त्या प्रताडितस्तीव्रं न्यपतन् मूर्छितो यदा ।।५
तदा जाम्बवतो वाक्या(द्) द्रोणाद्रिः क्षीरसागरात्।
लक्ष्मणार्थं वायुजेन समानीतो विहायसा ।।६
वेगेन गमनात् तस्य द्रोणाद्रेःशृङ्गम् उन्नतम्।
न्यपतद् भूमिदेशेऽत्र जरण्डाख्यं तद् उच्यते ।।७
तद् भूमौ पतितं ज्ञातं वायुजेनापि चेतसि।
अस्तु मत्स्मरणार्थं तद् भूमौ लोकहिताय हि ।।८
इति संचिन्त्य हनुमान् गतस्तूर्णं विहायसा।
लक्ष्मणं जीवयामास द्रोणाद्रेर् वल्लिभिः क्षणात् ।।९
ततः कालान्तरेणैव रामे राज्यपदे स्थिते।
हनुमान् पर्यटन् भूमौ कदा यातोऽत्र लीलया ।।१०
जरण्डारण्ये महच्छृङ्गे निजां मूर्तिं विधाय सः।
सूक्ष्मरूपा दश मूर्तीः स्थापयामास पर्वते ।।११
एवम् एकादशा ज्ञेया रुद्रास्तत्र प्रतिष्ठिताः।
तदा हनुमता यत्नान् मानवानां सुखाप्तये ।।१२
तस्मिन् गिरिवरे रम्ये सदैवासीत् स्वयं कपिः।
हनुमान् गुप्तरूपेण तपः कुर्वन् व्रतस्थितः ।।१३
जरण्डाख्यं महत् शृङ्गं द्रोणाद्रेः खण्डम् उत्तमम्।
दिव्यवल्लीसमाकीर्णं नानाधातुसुमण्डितम् ।।१४
यत्र वल्लीसुगन्धावग्रहणान् नृगदक्षयः।
भवत्येवाचिराद् दैवं फलितं सुकृतेन चेत् ।।१५
कलौ वल्ल्यो जनैः सर्वैर् न ज्ञायन्ते कदापि ताः।
दैवात् सुकृतिभिर् लभ्याः सुवर्णकरणक्षमाः ।।१६



# १०. 'जरंडाख्यान'

१-३ सकवारबाई म्हणतात- दीक्षितजी, माझे म्हणणे ऐका. कृष्णा-वेण्णांच्या संगमावर जरंडा (क्षेत्र) तुम्ही पूर्वी (सांगितले). संगमावर एक उत्तुंग पर्वत आहे तो (जरंडा?) तेथे कसा आला? कोणी आणला? केव्हा आणला? त्याचे माहात्म्य काय? हे सर्व मला सविस्तर सांगा. असे राणींचे वाक्य ऐकून सदाव्रती विद्वान दीक्षित सकवारबाईंना म्हणतात-

४-९ राणीसाहेब! आपण चांगले विचारलेत. ऐका, मी सर्व जरंडामाहात्म्य सांगतो. त्याच्या श्रवणाने पातक हरण होते. पूर्वी लंकेत (असताना) लक्ष्मणावर रावणाने रणांगणावर शक्ती टाकली. ती अतिशय पीडा करती झाली. लक्ष्मण मूर्च्छित होऊन पडला. तेव्हा जाम्बवंताच्या सूचनेवरून वायुपुत्र (हनुमानाने) लक्ष्मणासाठी आकाशमार्गाने क्षीरसागर (ओलांडून) द्रोणादी (आणला). वेगाने जात असल्यामुळे त्या द्रोणाद्रीचे उंच शिखर भूमीवर पडले, त्यालाच जरंड म्हणतात. ते भूमीवर पडत असल्याची हनुमानालाही मनात कल्पना आली. ते भूमीवर लोकहितार्थ राहू द्या, ते माझे स्मरण करून देईल, असा विचार करून हनुमान आकाशमार्गाने वेगाने (तसाच) पुढे गेला, (आणि) द्रोणाद्रीवरील वनस्पतींच्या साहाय्याने क्षणभरातच लक्ष्मणाला शुद्धीवर आणले.

१०-१६ त्यानंतर कालांतराने राम राज्यावर बसल्यानंतर हनुमान एकदा पृथ्वीवर भ्रमण करीत असता सहज म्हणून त्या ठिकाणी पोचला. जरंड नावाच्या मोठ्या शिखरावर स्वतःची मूर्ती स्थापन करून पर्वतावर (इतरत्रही) सूक्ष्म रूपात (आणखी) दहा मूर्ती स्थापन केल्या. अशा रीतीने त्याने अकरा रुद्र स्थापले असे समजा. त्यावेळी हनुमान प्रयत्नपूर्वक मानवांच्या सुखप्राप्तीसाठी त्या रम्य पर्वतावर स्वतःही सदैव राहू लागला. हनुमान त्या ठिकाणी गुप्त रूपाने व्रताचरणपूर्वक तपश्चर्या करीत (आहे). जरंड नावाचे (ते) मोठे शिखर द्रोणाद्रीचा उत्तम भाग आहे. दिव्य वनस्पतींनी आच्छादिलेले आणि अनेक धातूंनी मंडित असे आहे. तेथील वनस्पतींच्या सुगंधाच्या अवघ्राणाने मानवांच्या रोगांचा लौकरच नाश होतो. पुण्याच्या प्रभावाने दैव फळाला आले, तर कलियुगात सर्वांना केव्हाच त्या वनस्पतींचे ज्ञान नसते. दैवयोगाने पुण्यवानांनाच सोन्यात रूपांतर करू शकणाऱ्या (त्या वनस्पती) मिळू शकतात.

१७-२३ तेथेच पूर्वी राहात असता वायुपुत्र हनुमानाने आपल्या अंशाने कलियुगात अवतार धारण केला. भगवान् रुद्र(च) स्वतःच्या अंशाने या पृथ्वीवर

तत्रैव वसता पूर्वं वायुपुत्रेण सुन्दरि।
अवतारो धृतः पूर्वं निजांशेन कलौ युगे ।।१७
सर्वेषां मानवानां च समुद्धारार्थम् आदरात्।
रामदासाह्वयो विप्र-कुलजो ज्ञानिनां वरः ।।१८
बभूव भगवान् रुद्रः स्वांशनैव क्षितौ इह।
ज्ञानवान् गुणसंपन्नः शान्तो दान्तः क्षमी शुचिः ।।१९
श्रीरामोपासकः श्रेष्ठः सदैवानन्दनिर्भरः।
यदृच्छालाभसंतुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः ।।२०
जाम्बलेखकवंशीयः चाफलग्रामवासकृत्।
हुरम् उद्देशजा रक्ता हुरमुत्मृत्तिका वरा ।।२१
तद्रक्तवर्णवसनकृतप्रावरणः कविः।
दासबोधादिसद्ग्रंथकरः शिष्योपदेशकृत् ।।२२
शुक्लभिक्षाकरो नित्यं देवब्राह्मणभक्तिमान्।
बभूव ज्ञानिनां श्रेष्ठो महापुरुषसंज्ञकः ।।२३
एकादश-महारुद्रान् स्थापयामास यस्त्विह।
एकं सिङ्गनवाटिस्थं चाफले मारुतिद्वयम् ।।२४
माजग्रामे चतुर्थं च तथोम्बरजसस्थितम्।
स्याहापुर-मसूरस्थे बाहस्थं चाष्टमं स्मृतम् ।।२५
पारे सिराळे द्वे चास्तां महाबलस्थितं महत्।
एवम् एकादशान् रुद्रान् स्थापयामास भूतले ।।२६
परळीदुर्गमासाद्य स्वावतारस्य पूर्णताम्।
यश्चकार महाश्रेष्ठो मोक्षम् आपाचिरादिह ।।२७
चाफले येन रामस्य जानक्या लक्ष्मणस्य च।
मूर्तयः स्थापिता रम्या दर्शनात् पातकापहाः ।।२८
राममन्त्रोपदेशं यस्तव भर्तुः पितामहम्।
शिवभूपं चकारात्र निजवाक्यानुवर्तिनम् ।।२९
यस्य मन्त्रस्य सामर्थ्यात् सद्गुरोः कृपयापि च।
प्रतापं प्राकरोद् भूम्यां जित्वा यावनपार्थिवान् ।।३०
एवं मम यथा राज्ञि त्वया पृष्टं मयोदितम्।
जरण्डाशृङ्गमाहात्म्यं रामदासकथादिकम् ।।३१

इति श्रीभविष्येऽखिले (सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गमाहात्म्ये
जरण्डाख्यानं नाम दशमोऽध्यायः ।।१०)



गांभीर्याने सर्व मानवांच्या उद्धारार्थ श्रेष्ठ ज्ञानी, म्हणून रामदास नावाने ब्राह्मण कुलात जन्म घेतला. ज्ञानवान, गुणसंपन्न, शांत, दांत, क्षमावान पावन, श्रेष्ठ रामोपासक (असे ते साक्षात् रुद्रच). नित्य आनंदमग्न, सदृच्छेने मिळेल त्यावर संतुष्ट राहणारे, द्वंद्वाच्या पलीकडे गेलेले मत्सरहीन (असे रामदास) जांब..., चाफळ गावात राहात होते. हुरमुजी रंगाचे लाल वस्त्र धारण करणारे, तसेच भस्म लावणारे कवी (रामदासांनी) शिष्यांना उपदेश करणारा, दासबोधादी ग्रंथ लिहिले. कोरडी भिक्षा घेऊन, नित्य देवब्राह्मणांविषयी भक्ती बाळगून हा महापुरुष संज्ञेला पात्र असा श्रेष्ठी ज्ञानी होऊन गेला.

२४-२७ त्यांनी जे एकादश रुद्र स्थापिले (त्यांचा तपशील) एक सिंगणवाडीला, दोन चाफळात, चौथा माजगावला आणि उंब्रजलला, 'शहापूर आणि मसूरला, आठवा बहे, सिराळेच्या पलीकडे दोन, आणि महाबळेश्वरला याप्रमाणे अकरा रुद्र या भूतलावर स्थापले. (नंतर) परळीच्या किल्ल्यावर पोचून व आपल्या अवताराची पूर्णता (झाली असे मनात आणून) हा महाश्रेष्ठ (पुरुष) लौकरच मोक्ष मिळविता झाला.

२५-३१ चाफळ (गावी) राम, सीता आणि लक्ष्मण यांच्या रम्य मूर्तींची (त्यांनी) स्थापना केली. त्या (मूर्ती) दर्शनपात्रेच पातक हरण करणाऱ्या आहेत. आपल्या यजमानांचे पितामह- स्वतः बोलीन तसे चालणाऱ्या- शिवभूपती यांना (त्यांनी) मंत्रोपदेश दिला (आणि) या ठिकाणी (त्यांनी) स्वतःच्या मंत्रांच्या सामर्थ्याने आणि सद्गुरूच्या कृपेने मोठा पराक्रम गाजवून पृथ्वीला यवनी राजांपासून मुक्त केले. याप्रमाणे राणीसाहेबांनी विचारल्यानुसार मी जरंडामाहात्म्य आणि रामदास कथानक वगैरे सांगितले.

'जरंडाख्यान' नावाचा दहावा अध्याय.

आसीद् भारतखण्डेऽत्र गोदानाभिविराजिते।
गोदावरीसिन्धुफेनासंगमे दक्षिणे तटे ।।६
मार्जारस्पर्शदोषघ्नम् ओतुहत्यानिवारकम्।
मञ्जरथाख्यं महत् क्षेत्रं महापातकनाशनं ।।७
यत्र त्रिविक्रमो देवः क्षेत्राधीशो विराजते।
मायगोस्वामिनी देवी देवपृष्ठे सदास्ति सा ।।८
वृषाकपिर्महादेवः संगमे यत्र राजते।
सोमेश्वरश्च रामेशो ब्रह्मा विष्णुश्च यत्र ते ।।९
तस्मिन् क्षेत्रे कलावग्रे ऋक्शाखाध्यायिनां भवेत्।
उपाध्यायोपनाम्नात्र द्विजानां च पुरोहितः ।।१०
आपस्तम्बद्विजानां च तथा च सामवेदिनाम्।
पुरोहितः स एवात्र शंभुशर्मा भविष्यति ।।११
काश्यपान्वयसंभूतो ऋग्वेदी शास्त्रविद् द्विजः।
तत्पुत्रः कपिलश्चाग्रे भविष्यति मुनीश्वराः ।।१२
रामचन्द्रश्च तत्पुत्रो महादेवश्च तत्सुतः।
नृसिंहाख्यश्च तत्पुत्रो रामचन्द्राह्वयः पुनः ।।१३
नृसिंहजठरोद्भूतः सर्वविद्याविशारदः।
भविष्यति कलावग्रे लक्ष्मीजठरसंभवः ।।१४
वेदवेत्ता शास्त्रवेत्ता चिकित्सज्ञः कवीश्वरः।
श्रौतस्मार्तैकमर्मज्ञो धर्मशास्त्रार्थविन् महान् ।।१५
रामसद्भक्तिमान् दाता शुचिश्चेन्द्रियनिग्रही।
चान्द्रायणव्रतादीनां कर्ता युक्तिविशारदः ।।१६
शाकाहारी यवाहारी तिलाहारी कदाभवत्।
यवसंभृष्टपिष्टादिपयोव्रतपरायणः ।।१७
काशीरामाश्वरौ दृष्ट्वा दृष्ट्वायोध्यां गयाम् अपि।
वृक्षखण्डे वैजनाथं नीत्वा भागीरथीजलम् ।।१८
स्वस्कन्धवाहितां चासौ गङ्गां नीत्वा च दक्षिणम्।
रामेशं रामसत्सेतौ स्नापयिष्यति भक्तितः ।।१९
दक्षिणोत्तरतीर्थानि कृत्वा निजपदैव यः।
स्वपित्रोश्चास्थिसंघं च प्रयागे प्रक्षेपयिष्यति ।।२०
अग्निहोत्रं स्वयं कृत्वा राजारामसुताय हि।
दापयिष्यत्यग्निहोत्रं सोमयागौ उभौ अपि ।।२१
चातुर्मास्य-पशुबन्धैश्चरिष्यत यथा भगात्।
अन्नसत्रं प्रपादानं गोदाभीमरथीतटे ।।२२
चिरकालं निजद्रव्यैः करिष्यति ह्युदारधीः।
अम्बानाम्नी तु तत्पत्नी भर्तृवाग्वशवर्तिनी ।।२३



## १३. 'दीक्षिताच्या वंशाचे वर्णन'

६-१३ भरतखंडात गोदावरीच्या काठी गोदावरी, सिंधू आणि वेण्णा (?) यांच्या दक्षिण तटावर, मांजराच्या स्पर्शाचा दोष घालविणारे आणि त्याच्या हत्येचे निवारण करणारे महापातकनाशक असे 'मंजरथ' या नावाचे एक मोठे क्षेत्र आहे. त्याठिकाणी क्षेत्राधीश त्रिविक्रम देव प्रसिद्ध आहे. मायगोस्वामिनी देवी त्या देवाच्या पृष्ठभागी आहे. संगमावर वृषाकपी महादेव, सोमेश्वर, रामेश ब्रह्मा, विष्णू आहेत. त्या क्षेत्रावर कलियुगात ऋग्वेदी शाखेचे अध्ययन करणारे सर्वांत पुढे आहेत. उपाध्याय (उपाध्ये) नावाचा ब्राह्मणांचा पुरोहित, शंभुशर्मा नावाचा आपस्तंब ब्राह्मणांचा आणि सामवेद्यांचा पुरोहित, काश्यप गोत्राचा ऋग्वेदी शास्त्री, त्याचा पुत्र कपिल होईल (आहे). मुनिश्वरांनो! त्याचा मुलगा रामचंद्र, त्याचा मुलगा महादेव, त्याचा मुलगा नृसिंह (आणि) त्या (नृसिंहाचा)ही मुलगा रामचंद्र (त्या पदावर कार्य करीत आहे.)

१४-२५ नृसिंह आणि लक्ष्मी यांचा मुलगा (रामचंद्र) कलियुगात प्रधान सर्वविद्याविशारद, वेदवेत्ता, शास्त्रवेत्ता, चिकित्सज्ञ, कवीश्वर, श्रौतस्मार्तकर्मातील मर्म जाणणारा, धर्मशास्त्रार्थ जाणणारा, थोर आणि रामावर भक्ती असलेला, दाता, शुची, इंद्रियनिग्रह असलेला, चांद्रायणादी व्रते केलेला, युक्ती (=योग)?) विशारद, शाकाहारी, जव आणि तीळ यांचा आहार करणारा, जवात तळलेली पिठे आणि पाणी यावर व्रत करणारा आहे. त्याने काशी, रामेश्वर, अयोध्या, गया, यांची यात्रा करून जंगलातील(?) वैजनाथापर्यंत गंगा आणणारा, (आणि नंतर पुनः) आपल्या खांद्यावर गंगेच्या (पाण्याचा घडा) घेऊन दक्षिणेकडे रामेश्वर आणि रामाचा सेतू यावर भक्तीने अभिषेक (केला आहे). दक्षिणेकडची आणि उत्तरेकडची तीर्थे पायानेच गाठून त्याने आणि आईवडिलांच्या अस्थी प्रयागक्षेत्रात टाकल्या. स्वतः अग्निहोत्र घेऊन राजारामाच्या मुलाला ते देतो. दोनही सोमयाग, चातुर्मास्य पशुबंध केला. गोदावरी व भीमा नद्यांच्या काठावर अन्नसत्र, पाणपोया घातल्या. उदार बुद्धीचा तो रामचंद्र (आणखी) बराच काळ आपल्या द्रव्याच्या जोरावर ते चालवील. त्याची अंबा नावाची पत्नी नवऱ्याचा शब्द न मोडणारी, पतिव्रता, भाग्यशाली, पाककर्मात प्रवीण, आणि अतिशुद्ध (आचरणाची) आहे. त्यांचा दुसरा मुलगा बाळकृष्ण हा देखील दानधर्मपरायण आहे. भवानी आणि मणिकर्णिका या त्याच्या दोन मुली.

२६-२९ एका वर्षी पापनाशक अशा कन्यागत पुण्यनक्षत्रावर कृष्णा नदीवर,

पतिव्रता महाभागा पाककर्मविशारदा।
भविष्यत्यतिशुद्धा सा दानधर्मपरायणा ।।२४
बाळकृष्णाह्वयश्चान्यो द्वितीयस्तनयस्त्वपि।
भवानी मणिकर्णीति द्वे कन्येऽपि भविष्यतः ।।२५
कस्मिंश्चिद् वत्सरे कन्यागते जीवेऽघनाशने।
कृष्णां स्नातुं रामचन्द्रो गमिष्यति सदाव्रती ।।२६
अग्निहोत्रद्वयेनैव दीक्षितः स सपत्निकः।
महाबलातिबलिनौ तथा हरिहरेश्वरम् ।।२७
प्रतापाख्यां वरां देवीं धौमं तीर्थं विलोक्य च।
जरण्डास्थं वायुपुत्रं सह्याद्रिस्थां च मङ्गलाम् ।।२८
दृष्ट्वा देवं यवन्तेशं नत्वा पर्वतवासिनम्।
कृष्णावेण्योः संगमं च ययौ स दीक्षितस्ततः ।।१९
एतस्मिन्नन्तरे भूम्यां कृष्णादक्षिणदिक्तटे।
महाराष्ट्रः सूर्यवंशे मालवनृपतेः सुतात् ।।३०
शाहराजेश्वराद् अग्रे शिवराजा भविष्यति।
स रायगिरिम् आश्रित्य बलाद् राज्यं करिष्यति ।।३१
तत्पुत्रः शंभुशर्मात्र शंभोः पुत्रः शिवः पुनः।
भविष्यति नराधीशो शाहूनामा परं भवेत् ।।३२
माळराज्ञोऽत्र दयिता उमानाम्नी भविष्यति।
शाहराज्ञः शुभा पत्नी जिजूनाम्नीह कीर्तिता ।।३३
शिवराज्ञः प्रिया पनाख्या पवारकुलसंभवा।
सु(नाख्या?) पुण्यशीलासीन् सर्वलक्षणमण्डिता ।।३४
शंभुपत्नी राजसात्र भुवि ख्याता भविष्यति।
शाहूराज्ञो वरा पत्नी सुकुमारा निगद्यते ।।३५
सातिभक्तिमती विप्रे देवे भर्तरि कीर्तने।
पुराणश्रवणे दाने काव्ये तीर्थे व्रते गवि ।।३६
गुरौ भवान्यां नितरां भविष्यत्यवनीतले।
सैवेयं कीर्तिता पूर्वं स एव दीक्षितः स्मृतः ।।३७
संवादश्चोभयोः प्रोक्तो युष्माकं कलिसंभवः।
एवं प्रोक्तं दीक्षितस्य साग्निकस्य तथा पुनः ।।३८
राज्ञ्याश्चापि सविस्तारं वंशादिकथनं मया।
यद् अग्रे भाविवृत्तं तत् श्रवणान् मङ्गलप्रदम् ।।३९

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामहात्म्ये
दीक्षितस्य राज्ञ्या वंशादिवर्णनं नाम त्रयोदशोध्यायः ।।१३



नेहमीच व्रते करीत राहणारा रामचंद्र स्नानासाठी गेला. दोन अग्निहोत्रे घेऊन पत्नीसह त्या दीक्षिताने महाबली आणि अतिबली, हरिहरेश्वर श्रेष्ठ प्रतापदुर्गा देवी, धौमतीर्थ, जरंडावर असलेला वायुपुत्र (हनुमान), सह्याद्रीवरील मंगळाई, पर्वतावरील यवतेश्वर यांचे (दर्शन घेऊन व त्यांना) नमन करून तो कृष्णा-वेण्णांच्या संगमावर गेला.

३०-३२ मधल्या काळात कृष्णेच्या दक्षिण तीरावर महाराष्ट्रात सूर्यवंशातील मालोजीराजांच्या मुलानंतर (म्हणजे) शहाजीराजांच्यानंतर शिवाजीराजे झाले. त्यांनी रायगडचा आश्रय करून तेथे (महाराष्ट्रात) पराक्रमाने राज्य केले. त्यांचा मुलगा संभाजी, आणि त्या शंभूचाही मुलगा शिवाजी शाहू या नावाने राजा झाला.

३३- मालोजीची मुलगी उमा, शहाजीची कल्याणकारी पत्नी जिजू, शिवाजीची प्रिय (पत्नी) सई पवार पुण्यशील, व सर्वलक्षणमंडित होत्या. संभाजीची पत्नी राजसबाई, आणि शाहूराजांची प्रशंसनीय पत्नी सुकुमारा (सकवारबाई) तिची ब्राह्मणांवर, देवांवर, नवऱ्यावर, कीर्तनावर, पुराणश्रवणावर, दाने देण्यावर, काव्य (ऐकण्यावर) तीर्थ (यात्रा करण्यावर), व्रते करण्यावर, गायींवर, गुरूवर, (आणि) भवानी देवीवर नितांत श्रद्धा आहे. तिचा आणि (रामचंद्र) दीक्षितांचा याठिकाणी संदर्भ आहे. (मुनिवर हो!) त्यांचा या कलियुगात झालेला संवाद तुम्हाला (सांगितला). याप्रमाणे अग्निहोत्री दीक्षित आणि राणी (सकवारबाई) यांच्या वंशाचे मी सविस्तर कथन केले. यापुढे (सांगितले जाईल) ते वृत्तही श्रवण केल्यास मंगलप्रदच आहे.

'दीक्षिताच्या वंशाचे वर्णन' नावाचा तेरावा अध्याय.

दीक्षित उवाच।
अधुनाहं प्रवक्ष्यामि शिवराज्ञे यथाम्बिका।
जाता प्रसन्ना पूर्वं तु शाहूप्राणप्रियेऽनघे।।१
शिवांशाज्जनितो भूम्यां शिवराजा प्रतापवान्।
प्रतापदुर्गावरतः शाहराजात्मजः सुधीः।।२
मालवनृपतेः पौत्रः शाहुराज्ञः पितामहः।
शाके-श्रीशालिवाहेऽत्र भूबाणशरभूमिते (१५५१)।।३
शुक्लसंवत्सरे पुण्ये शैशिरे चोत्तरायणे।
फाल्गुनस्यासिते पक्षे तृतीयायां सुलग्नके।।४
निशायाम् अतिशृद्धायां प्रोच्चस्थे ग्रहपञ्चके।
शिवनरगिरौ एव यस्य जन्म बभूव तत्।।५
जयार्थी स शिवः पूर्वं जगाम तुलजापुरम्।
तत्रस्थां तुलजानाम्नीं समाराधयद् आदरात्।।६
यथा निजभगेनैव चिरकालं व्रतस्थितः।
स्वप्नमध्येऽ ब्रवीद् देवी शिवं शरणम् आगतम्।।७
त्वत्पूर्वजन्मार्जितं पुण्यसंचैः समर्चनेनापि तवाधुनात्र।
त्वद्दैवयोगादिह भक्तितस्त्वां तुष्टा वदाम्यद्य जवात्प्रसन्ना।।८
प्रतापदुर्गान्तरभूमिदेशे स्थितास्मि पूर्वं विधियज्ञकाले।
समर्चिता तत्र सुरैर्मुनीन्द्रै बल्यादिकास्ते दितिजा जिता हि।।९
प्रतापवीर्यो निहतः क्षणेन स्वकर्णभूषार्पणतश्च तत्र।
नानाजनैस्तीव्रसदैवभक्त्या याराधिताहं वरसह्यशृङ्गे।।१०
अत्रास्ति भूम्यां महनी शिलेयं नीत्वातियत्नेन विधेहि मूर्तिम्।
तत्रैव त्वं गण्डकीस्थां महतीं शिलां ताम्।
अम्बेन यत्नात् समवाप्य मूर्तिं कृत्वात्र मां स्थापय सह्यशृङ्गे।
महोत्सवेनाष्टभुजां मनोज्ञाम्।।११
त्वं याहि तत्रैव ममोत्सवेन विधेहि पूजां निजवैभवैश्च।
यास्यामि तत्रैव च निश्चयेन प्रत्यक्षतां त्वंशरणाङ्गणां हि।।१२
प्रतापदुर्गान्तरवासिनीं मां त्वद्वंशभूताः परिपूजयन्ति।
संरक्षयाम्यत्र सदैव तुष्टा त्वद्वंशभूतान् इह वीरवर्यान्।।१३
आज्ञापितः सन्निति दुर्गयेत्थं जागृद्दशायां नरवीरवर्यः।
समाययौ सह्यगिरीन्द्रमुख्ये तत्कन्दराभ्यन्तर शृङ्गवर्यम्।।१४
अम्बानुगैनैव हि गण्डकीस्थामानीय यत्नेन विधाय मूर्तिम्।
संस्थापयामास महोत्सवेन प्रतापदुर्गं प्रकरोन् मनोज्ञम्।
यावत् सुवेला घटिता तु तावत् पुनः सुवेलां घटयन्ति तज्ज्ञाः।।१५



## १४. 'शिवाजी व औरंगजेब कथा'

दीक्षित म्हणतात- १-५ शिवाजीराजांना अंबिका जशी प्रसन्न झाली ते मी, हे पवित्र राणीसाहेब, (आपणास) आता सांगतो. शिवाच्या अंशाने पृथ्वीवर प्रतापी शिवराजांचा प्रतापदुर्गेच्या वरामुळे हुशार अशा शहाजीराजांना (लाभ) झाला. मालोजीराजांचा पौत्र, आणि शाहूराजांचा पितामह (असा शिवाजीराजा) शालिवाहन शकाच्या भू- बाण- शर-भू म्हणजे १५५१ या शुक्ल (नावाच्या) संवत्सरात, शिशिर मासातील पुण्यकारक अशा उत्तरायणातील फाल्गुन वद्य तृतीयेला, सुलक्षणांवर प्रगाढ रात्री, पाच ग्रह अत्यंत उच्चीचे असताना शिवनेरी किल्ल्यावरच जन्मला.

६-७ जयाच्या आकांक्षेने तो शिवाजी प्रथम तुळजापूरला आला व त्याने तेथील तुळजादेवीची भक्तिपूर्वक आराधना केली. आपल्या स्वतःच्याच दैवाने (जणू) बराच काळ व्रतस्थ राहिल्यावर तो शरण गेला आणि देवीने त्याला स्वप्नात सांगितले-

८-१३ "तुझ्या पूर्वजन्मात कमविलेल्या पुण्यामुळे तू आता या ठिकाणी माझी पूजा केलीस. तुझ्या दैवयोगामुळे (व) तुझ्या भक्तीमुळे मी लौकरच प्रसन्न होऊन तुला (आता) सांगते. प्रतापदुर्गाच्या अंतर्गत भूमीवर पूर्वी ब्रह्मदेवाच्या यज्ञप्रसंगी माझी आराधना झाली. त्यानंतर देव, मुनी, बली वगैरे दैत्य जिंकले. प्रतापवीर्याचा आपली कर्णभूषणे (त्याच्यावर) फेकून (मी) त्याचा क्षणात वध केला. या श्रेष्ठ अशा सह्य पर्वताच्या शिखरावर अनेक लोकांनी माझी तीव्र भक्तीने सतत आराधना केली. या भूमीवर एक मोठी शिळा आहे. ही (शिळा) नेऊन तू प्रयत्नपूर्वक एक मूर्ती बनव. गंडकी (नदी)वरील मोठी शिळा तिथेच आहे. यत्नपूर्वक मिळवून (व) सह्य शिखरावर माझी स्थापना मोठ्या उत्सवासह सुंदर अष्टभुजा अशा माझी तेथे स्थापना कर. तू त्या ठिकाणी जा (आणि) उत्सवपूर्वक माझी पूजा आपल्या वैभवाला (शोभेल अशी) कर. तेथेच मी निश्चयाने रणांगणावर प्रत्यक्ष अवतरेन. प्रतापदुर्गाच्या आतील भागात असलेल्या मला तुझे वंशज पूजतील. मी या ठिकाणी सदैव संतुष्ट (मनाने) तुझ्या शूर वंशजांचे रक्षण करीन."

१४-१५ याप्रमाणे आज्ञा झाल्यावर दुर्गेच्या इच्छेनुसार तो नरवीर (शिवाजी) जागा झाला. सह्य पर्वताच्या मुख्य अशा कंदरेतील श्रेष्ठ शिखरावर आला. त्याने देवीच्या भक्तांकरवी गंडकीतील (शिळा) आणून, यत्नपूर्वक मूर्ती बनवून तिची महाउत्सवासह स्थापना केली (व) प्रतापगड रमणीय बनविला. सुवेळ होते तोच

सार्धत्रिभिश्चापि समैः सुसिद्धां मार्गेऽपि यत्नाद् बलिभिर् विनीताम्।
प्रतापदुर्गेति धृताभिधानां समर्चयामास यथाभगेन।
महोत्सवेनैव हि तुष्टचित्तो द्विजेन्द्रसंघैर् जनसंघयुक्तः ।।१६
चकार देव्यालयम् आदरेण प्रोच्चं शिलाभिर्वरदुर्गमध्ये।
चित्रैर्विचित्रैरतिरम्यमाणं तथैव तीर्थं स बबन्ध चित्रम् ।।१७
प्रत्यक्षताम् आप शिवं भवानी ददौ वरान् तद्धृदि संस्थितान् सा।
वसामि नित्यं तव संनिधौ हि त्वत्कार्यकर्त्रीत्यवदन् नरेन्द्रम् ।।१८
यस्याः प्रसादाद् अवनीं बलेन चकार देवः स्ववशां शिवाजी।
राजाभवद् दक्षिणभूमिदेशे मुद्रां स्वकीयां विदधे जनेषु ।।१९
छत्रं निजोर्ध्वं धृतवान् नृपेन्द्रः सिंहासनस्थोऽतितरां विरेजे।
यन्नामधेयश्रवणान् नृपेन्द्रा वित्रस्तहृत्कंजयुता अभूवन् ।।२०
चकार राज्यं वरभीमरथ्याः तीरान्तम् उच्चं यवनान् विजित्य।
अश्वस्थितैर्भल्लकरैरपारैः यकारभूमिं सरुजां सदैव ।।२१
नानाप्रदेशान्तरसंस्थितानि पुराणि राष्ट्राणि च पत्तनानि।
स लुण्ठयामास निजानुगैश्च सेनान्वितैस्तीव्रबलैर् मुहुः सः ।।२२
देशान्तराद् आहृतसर्वलक्ष्मीं बुभोज राजातितरां शिवाजी।
यस्य प्रतापाद् यवना नृपेन्द्रा नित्यं विभिन्नैर् हृदयैर् अभूवन् ।।२३
तस्मिन् अवसरे भूम्याम् अवरञ्जेब-नामधृक्।
यवनः पृथिवीपालो दितिजांशाद् बभूव ह ।।२४
सोऽकरोन् निजधर्मस्य प्रतिपालनम् आदरात्।
यथाकालं त्रिकालं च निजकर्माकरोत् शुभम् ।।२५
जितेन्द्रियः शुचिर्ज्ञाता तपस्वी चतुरः सुधीः।
मितभुक् गाङ्गपो नित्यं निजशास्त्रार्थविद् व्रती ।।२६
यवनेतरजातीनां द्वेष्टाभूद् अवनीतले।
देवालयानां देवानां तीर्थादीनां विशेषतः ।।२७
उच्छेदं कृतवान् क्रूरो ब्राह्मणद्वेषकारकः।
तस्य राज्ये महाक्रूरे यात्रा यज्ञोत्सवादिकम् ।।२८
सर्वं द्विजादीनां लुप्तं देवपूजाव्रतादिकम्।
येनार्द्रं हृन्मध्यस्थम् अन्नं ग्राह्यम् उतीरितम् ।।२९
सर्वान् दुन्दुभिनादेन नारीकच्छोऽपि वर्जितः।
विप्रादिभ्यः करं दूतैर् ग्राहयामास सादरम् ।।३०
प्रतिसंवत्सरं सर्वजातिभ्यो यवनं विना।
तस्य राज्ञो बलेनैव यवनास्ते मदोद्धताः ।।३१



तज्ज्ञ पुनः सुवेला (सुमूहर्त) निर्मितात.

१६-१८ साडेतीन वर्षांनी सिद्ध झालेल्या, मार्गावर यत्नाने बली वगैरेंनी बनविलेल्या आणि प्रतापदुर्गा नाव धारण करणाऱ्या (माझ्यासाठी) ब्राह्मणवृंदासह जनसंघाने संतोषाने सामर्थ्यानुसार महोत्सवानेच भक्तिपूर्वक या श्रेष्ठ किल्ल्यात शिळांनी एक उंच देवालय निर्मिले. चित्रविचित्र (शोभांनी) अतिरम्य करून हे तीर्थ आश्चर्यच बनविले. भवानीने शिवाजीराजाला प्रत्यक्ष दर्शन दिले, आणि त्याच्या मनात असलेले वर दिले- 'मी तुझ्या जवळ नित्य राहीन आणि तुझे कार्य करीन' असे राजाला सांगितले.

१९-२३ तिच्या प्रसादाने शिवाजी बलपूर्वक पृथ्वी ताब्यात आणून राजा झाला. दक्षिणेकडील भूमीवर लोकांत त्याने स्वतःची मुद्रा निर्माण केली. स्वतःवर छत्र धारण केले, (आणि) सिंहासनस्थ राजा म्हणून अतिशय शोभला. त्याच्या नावाचा उच्चार कानावर पडताच राजांची हृदयकमले भीतीने त्रस्त झाली. उत्तम अशा भीमा नदीच्या तीरापर्यंत यवनांना पराजित करून त्याने श्रेष्ठ राज्य बनविले. घोड्यावर बसलेल्या भालाधारी अपार (सैनिकांनी) या भूमीला सदैव चिंतामुक्त ठेविले. अनेक प्रदेशांतील पुरे, राष्ट्रे आणि नगरे त्याने पुनःपुन्हा तीव्र बल असलेल्या आपल्या अनुयायी सेनेच्या जोरावर लुटली. दुसऱ्या देशांतून आणलेल्या सर्व लक्ष्मीचा शिवाजीराजाने पुष्कळ उपभोग घेतला. त्याच्या प्रतापाने यवन राजे सदैव हृदयांनी विदीर्ण झाले होते.

२४-३० अशावेळी या भूमीवर औरंगजेब या नावाचा एक यवन राजा दैत्यांच्या अंशाने निर्माण झाला. तो भक्तीने आपल्या धर्माचे पालन करी. यथाकाल त्रिकाळ शुभ असे स्वकर्तव्य करी. जितेंद्रिय, शुची, ज्ञाता, तपस्वी, चतुर, बुद्धिमान, मिताहारी, नित्य गंगाजल पिणारा, आपल्या धर्माचा अर्थ जाणणारा, आणि व्रते करणारा (हा औरंगजेब) यवनांखेरीज इतर जातींचा द्वेष करी. पृथ्वीवरील देवळे आणि देव, विशेषतः तीर्थस्थाने, यांचा त्या क्रूर अशा ब्राह्मणद्वेषी (राजाने) उच्छेद केला. त्याच्या अतिशय क्रूर अशा राज्यात ब्राह्मणांची यात्रा-यज्ञ, उत्सव, पूजा, व्रते लुप्त करून टाकली. त्याने आर्द्र असे मांसयुक्त (?) अन्न खावे असे सांगितले, (व) नगारे वाजवून स्त्रियांना कच्छमुक्त केले (आणि) प्रयत्नपूर्वक दूतांकरवी ब्राह्मणादिकांकडून कर वसूल करू लागला, दरवर्षी यवनाखेरीज सर्व जातींकडून.

३१-३३ त्या राजाच्या बलवत्वामुळे यवन मदाने उद्दाम झाले. ताम्र, तांबडमुखे, क्रूर, सुंता झालेले, (आणि) अग्रगण्य खलपुरुष असे (ते यवन)

ताम्रास्ताम्राननाः क्रूराश्छिन्नलिङ्गाग्रिणः खळाः।
विप्रादिसर्वजातीनां स्त्रीर् दृष्ट्वातिसुरूपिणीः ।।३२
बलेन घर्षयन् सर्वाः स्त्रीः कृत्वा निजमन्दिरे।
स्थापयामासुः सर्वत्र न भयं कस्यचित् क्वचित् ।।३३
एवं नृपेऽत्र पापिष्ठे यावने कलिमोहिते।
धरिणी दुष्टभारार्ता हरिं शरणम् अन्वगात् ।।३४
हरिर् देवैर् युतः केन शिवं वृत्तं न्यवेदयत्।
शिवः प्राह तदा विष्णुं धरणीं निर्जरादिकान् ।।३५
ब्रह्माणं स्वान्तिकं प्राप्तान् दत्वादौ अभयं मुहुः।

**शिव उवाच।**

एतद्भाविनिमित्तेन धरण्या रक्षणाय हि ।।३६
अवतारो निजांशेन धृतः पूर्वं क्षितौ मया।
शाहराजात्मजो वीरः शिवाजीनामधारकः ।।३७
तत्साहाय्यं कर्तुकामा देवी तत्रैव संस्थिता।
प्रतापदुर्गानाम्नी सा शिवाख्यं रक्षयिष्यति ।।३८
सा शिवाख्यं पुरस्कृत्य भवानी लीलयाखिलान्।
संहारयिष्यति स्वीयप्रतापाद् एव यावनान् ।।३९
अग्रेऽपि तत्कुलोद्भूतैः शंभुशाहुनृपादिकैः।
अपकर्षं यावनानाम् उत्कर्षं तु द्विजादिनाम् ।।४०
सैवात्र लीलया देवी कारयिष्यति निश्चयात्।
स्वस्थचित्तैर् भवद्भिस्तु गन्तव्यं स्वस्थलानि हि ।।४१
दुष्टानाम् अपकर्षं च साधूनां पालनं क्षितौ।
विप्रादिसर्वजातिस्थस्वधर्मं पालयिष्यति ।।४२
यज्ञयात्रोत्सवाः सर्वे देवालयकृतिः पुनः।
स्थापनं देवतानां च पूर्ववत् तद् भविष्यति ।।४३

**दीक्षित उवाच।**

इति शंभ्वाश्वासितास्ते हरिब्रह्मपुरःसराः।
ययुः सुराः स्वालयानि धरणी मुदिताभवत् ।।४४

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
शिवावरञ्जेबविस्तारवर्णनं नाम चतुर्दशोऽध्यायः ।।१४



ब्राह्मण वगैरे सर्व जातींच्या सुस्वरूप स्त्रियांना पाहताच ते त्या सर्वांना बलपूर्वक अत्याचार करून आपल्या घरात ठेवत असत. सर्वत्र (हे असेच चालत होते.) (त्यांना) कुणापासूनही भीती (म्हणून) वाटत नसे.

३४-३५ असा हा अत्यंत पापी यवन राजा कलीमुळे मोहित झाला असता दुष्टांच्या भाराने त्रासून जाऊन धरिणी विष्णूला शरण गेली- विष्णू देवांना बरोबर घेऊन शिवाकडे हे वृत्त सांगता झाला. विष्णू, धरिणी, देव आणि ब्रह्मा त्याच्याकडे आल्यावर प्रथम अभय देऊन शिव म्हणाले-

शिव म्हणाले- ३६-४३- 'हे होणार म्हणून धरणीचे रक्षण करण्यासाठी आपला एक अंशावतार पूर्वी धारण केला. शहाजीराजांचा शिवाजी नावाचा शूर पुत्र, आणि त्याला साहाय्य करण्याची इच्छा असलेली देवीदेखील तेथे होती. प्रतापदुर्गा या नावाने ती शिवाजीचे रक्षण करील. शिवाजीला पुढे करून भवानी सहजपणे सर्व यावनांचा स्वतःच्या सामर्थ्याने संहार करील. आणि त्यानंतरही त्याच्या वंशजांकडून (म्हणजे) संभाजी, शाहू, (इत्यादी) राजांकडून यवनांचा अपकर्ष आणि ब्राह्मणांचा उत्कर्ष, तीच देवी लीलेने निश्चितपणे घडवून आणील. आपण स्वस्थ मनाने आपापल्या स्थानाकडे जावे. (ती) दुष्टांचा अपकर्ष आणि सज्जनांचे रक्षण करून पृथ्वीवर ब्राह्मणादी सर्व जातींना स्वधर्म पाळावयास लावील. यज्ञ, यात्रा, उत्सव, देवालये, आणि त्यांतील देवतांच्या मूर्ती सर्व काही पहिल्या-प्रमाणे चालू राहील.

दीक्षित म्हणतात- ४४ - शंकरांनी याप्रमाणे आश्वासन दिल्यावर विष्णू, ब्रह्मदेव इत्यादी देव आपापल्या स्थानी गेले. पृथ्वी आनंदित झाली.

'शिवाजी व औरंगजेब कथा' नावाचा चौदावा अध्याय.

दीक्षित उवाच।

ततोऽवरङ्जेबभूपो यावनो दुष्टधीःक्षितौ।
विप्रादिसर्वजातिस्थम् उत्कर्षं न सहिष्यति॥१
विप्रादिकानां सर्वेषां रक्षणं कर्तुम् उद्यतम्।
शिवाख्यं भूपतिं वीरं न सहिष्यत्यहर्निशम्॥२
शिवोऽपि विजयी भूम्यां रायदुर्गोपरि स्थितः।
द्विपञ्चाशच्च दुर्गाणि नानाशृङ्गकृतानि तु॥३
निजसंरक्षणं कर्तुं चकार सह्यपर्वते।
यवनेशोऽवरङ्जेबश्चैकैकं दुर्गम् उन्नतम्॥४
यत्नतश्चिरकालेन स्वाधीनं प्राकरोद् धिया।
सामदानदण्डभेदैः सेनयात्र शनैः शनैः॥५
तस्यैवानुमतेनायं विजयापुरसंस्थितः।
एदिलस्तं शिवं भूपं नासहद् यवनान्तकम्॥६
छद्मनासौ शिवं भूपं विनिहन्तुं समुद्यतः।
साम कर्तुं दुष्टबुद्ध्या निजमन्त्रिगणेऽवरम्॥७
प्रेषयामास सैन्येन विराटविषयं प्रति।
अफजलाख्यं वीरं यवनं छद्मवेदिनम्॥८
तदा कृष्णातटं वृक्षखण्डैस्तं सर्वतो वृतम्।
वृकव्याघ्रवराहादिनानावृन्दशतान्वितम्॥९
कण्टकद्रुमसंकीर्णं दिव्यवल्लीवनैर् युतम्।
रविप्रकाशरहितं प्रकाशोऽपि क्वचित् क्वचित्॥१०
सरित्सरःसमाकीर्णं धावच्छ्वापददिङ्मुखम्।
तत्र सेनानिवासं स चकाराफजलो महान्॥११
नाम्ना जावळखोरेति देशो यन्निकटेऽस्ति हि।
तत्र वृक्षखण्डमध्ये गुप्तासीत् तस्य सा चमूः॥१२
यातायातं सदा चक्रुस्तस्य दूताः शिवं नृपम्।
शिवोऽपि सर्ववित् तस्य तच्छद्म ज्ञातवान् हृदि॥१३
ययौ प्रतापदुर्गां तां प्रसादयितुम् आदरात्।
देव्याः समर्चनं कृत्वा निशायां देवतालये॥१४
तत्रैव निद्रितो राजा शिवाजी भक्तिमान् रहः।
तदा तन्मस्तकस्या भवान्याऽसितम् उज्ज्वलम्॥१५
अतितीक्ष्णं न्यस्तम् आदौ कवचं त्वप्यभेदकम्।
स्थापयामास वेगेन पश्चात् स्वप्नेऽब्रवीच्छिवम्॥१६
"राजन् चिन्तात्र ते मास्तु दुष्टोऽयं छद्मनागतः।
एदिलेन प्रेषितोऽयं विजयापुरभूभृता॥१७



## १५. 'अफजलागमन'

दीक्षित म्हणतात- १-६- औरंगजेब हा यावनी (बादशहा) दुष्ट बुद्धीचा असल्यामुळे पृथ्वीवर ब्राह्मणादी कोणत्याच जातीचा उत्कर्ष सहन करीत नव्हता. विप्रादिक सर्व जातींचे रक्षण करण्यास उद्युक्त झालेल्या शूर शिवाजीराजांना तर तो अहर्निश पाण्यात पाहात असे. शिवाजीदेखील विजयी म्हणून रायगडावर होता. त्याने बावन्न किल्ले(पर्वतांच्या) अनेक शिखरांवर स्वतःचे संरक्षण करण्यासाठी सह्याद्रीच्या (परिसरात) बांधले होते. यवनेश औरंगजेबही उंच आणि दुर्गम असा एकेक किल्ला पुष्कळ काळ घालवून प्रयत्नाने व बुद्धी (चालवून) साम-दाम-दंड-भेद (योजून) (आणि) लष्कराच्या बळावर हळूहळू ताब्यात आणीत होता. त्याच्या अनुमतीने विजापूरचा अदिलशहा यवनशत्रू शिवाजी राजांचा द्वेष करीत होता.

७-१२ तो (अदिलशहा) लबाडीने शिवाजीराजांना मारण्याच्या प्रयत्नात होता. आपल्या मंत्रिगणातील एक (सदस्य) असलेल्या, लबाडी जाणणारा शूर यवन (सरदार) अफजलखान याला सैन्य देऊन समेट करण्यासाठी, (पण मनात) दुष्ट बुद्धी ठेवून विराट प्रदेशाकडे पाठविले. त्याकाळी कृष्णा नदीचा तीर वृक्षांनी सर्व बाजूंनी झाकलेला होता. लांडगे, वाघ, रानडुकरे, अशी शेकडो जनावरे त्यात होती. काटेरी झुडपे आणि दिव्य (औषधी) वनस्पतीही त्यात होत्या. सूर्यप्रकाश जवळजवळ नव्हताच, क्वचित् सूर्यकिरणांचे (कवडसे) असत. नद्या आणि सरोवरे यांनी व्याप्त असा तो (प्रदेश) होता. श्वापदे (इकडे तिकडे) धावत असल्याने दुःखदच होता. अशा ठिकाणी अफजलखानाने सैन्याचा तळ ठोकला. जवळच जावळीचे खोरे या नावाचा प्रदेश होता. त्याच्या जंगलात त्याने आपले सैन्य लपवून ठेवले.

१३-(१६) त्याचे दूत सतत शिवाजीराजाकडे जात-येत असत. शिवाजीलाही हे सर्व माहीत होते, व मनात त्याचे कपट तो जाणून होता. (त्यामुळे) तो प्रतापदुर्गा (देवीला) प्रसन्न करण्यासाठी भक्तिपूर्वक पूजा करून रात्री देवळातच झोपला. त्यावेळी भवानीने त्याच्या मस्तकावर (अभेदक शुभ्र व तेजस्वी कवच ठेवले).

१६-२१ अत्यंत तीक्ष्ण, आणि अभेदक असे कवच त्याच्या मस्तकावर

साम कर्तुं समायातस्त्विति त्वां दर्शयन् खलः।
विश्वासं कुरु नैवास्य त्वद्घातार्थं समुद्यतः ।।१८
मद्दत्ताऽसिमध्येऽहं विशामि शिवपार्थिव।
तस्य कञ्चुकमध्येऽस्ति जठरोपरि धारितः ।।१९
स्फ्यस्तीक्ष्णः सूक्ष्म एवासौ तेन त्वां हन्तुम् एष्यति।
ज्ञात्वा त्वम् असितं चैतद् गोप्य स्वकरकञ्चुके ।।२०
तदा मद्दत्तकवचं त्विदं केनाप्यभेदकम्।
कृत्वा निजशरीरे त्वं व्रजाहूतस्तदन्तिकम् ।।२१
वृक्षखण्डे निजां सेनां पृथक् वृक्षतलाधतः।
तत्र सर्वत्र संस्थाप्य रहः केनाप्यवेदिताम् ।।२२
यदोभयोर्दर्शनं तद् भविष्यति रहस्तदा।
स त्वाम् आलिङ्गनं दातुं भुजौ अग्रे करिष्यति ।।२३
तदालिङ्ग्य तं दुष्टं त्वां ज्ञात्वालिङ्गितं खलः।
कञ्चुकाद् उदरस्थात् स स्फ्यं गृहीत्वा जवेन तु ।।२४
त्वा हन्तुं पृष्ठदेशेन त्वत्कुक्षौ रोपयिष्यति।
तदा त्वं चञ्चलाङ्गं स्वं कृत्वा तद् विफलं कुरु ।।२५
ततो निजकरस्थं यत् कञ्चुकान्तरगोपितम्।
असितं बाह्यतः कृत्वा तेन तं जहि वेगतः ।।२६
रोपयित्वा रिपोः कुक्षिं विदार्य निजसारतः।
प्रतापं प्रकटं सर्वान् दर्शयस्वात्र भो शिव ।।२७
त्वद्बाहुसंस्थिता भूत्वाहं त्वत्साहाय्यकारिणी।
विजयं ते करिष्यामि हनिष्यामि रिपुं तव ।।२८
त्वत्प्रतापात् च मे नाम प्रतापगिरिजेति यत्।
तत् सत्यं सर्वलोकेषु भविष्यति न संशयः ।।२९
निःसंशयेन याहि त्वं मा चिन्ता तेऽस्तु वै क्वचित्।
त्वद्वंशभूतभूपानाम् एवमेव सदाग्रतः ।।३०
पालयिष्यामि समरे कृत्वा तत्साह्यतां मुहुः।
अहं कुठाररूपात्र त्वद्वंशो दण्ड एव हि ।।३१
उभयोर्योगतो दैत्यवृक्षच्छेदो भविष्यति।
पृथ्वीयं दुष्टभारेण खिन्ना सा शरणं गता ।।३२
शिवं तेनाश्वासितासीत् तद्भारं संहराम्यहम्।
दुष्टानां हि क्षयं कर्तुं साधूनां पालनाय तु ।।३३
मयात्र संस्थितं भूम्याम् त्यक्त्वा कैलासम् उत्तमम्।
अत्र भाविनृपा येऽग्रे भविष्यन्ति कलेर्युगे ।।३४



झटपट प्रथम ठेवून नंतर ती स्वप्नात शिवाजीला म्हणाली-

''राजा! तू चिंता करू नकोस. हा दुष्ट लबाडीने तेथे आला आहे. अदिलशहाने, विजापूरच्या बादशहाने, त्याला पाठविले आहे. तह करण्यास आला आहे असे तो दुष्ट (फक्त) दाखवीत आहे. त्याच्यावर विश्वास ठेवू नकोस. तो तुझा घात करण्यास उद्युक्त झाला आहे. शिवाजाराजा ! मी दिलेल्या खड्गामधे मी राहणार आहे. त्याच्या अंगरख्यात पोटाच्या वर एक तीक्ष्ण 'स्फ्य' (म्हणजे जंबिया) लपवून ठेवलेला असेल. त्याने तो तुला मारण्यास येईल. ते लक्षात घेऊन तू आपल्या अंगरख्यातही तलवार लपवून ठेव. त्यावेळी मी दिलेले हे अभेदक कवच आपल्या मस्तकावर ठेवून तू त्याने बोलाविल्यावर त्याच्या जवळ जा.

२२-३० ''जंगलात आपले सैन्य वृक्षांच्या तळाशी स्वतंत्रपणे सर्व ठिकाणी (पसरून) एकांतात कोणालाही कळू न देता ठेव. जेव्हा दोघांची एकांतात भेट होईल तेव्हा तो तुला आलिंगन देण्याकरिता आपले बाहू पुढे करील. तेव्हा आलिंगन देणाऱ्या तुला दुष्ट समजून तो खलपुरुष पोटावर अंगरख्यात (लपविलेला) जंबिया काढून वेगाने तुला मारण्यासाठी पाठीमागून तुझ्या कुक्षीत खुपशील. तेव्हा तू आपले शरीर चंचल करून तो (वार) विफल कर. नंतर आपल्या हातातील अंगरख्यात लपविलेले खड्ग बाहेर काढून त्याने तू त्वरेने त्याला मार. शत्रूच्या पोटात (जंबिया) खुपसून आपल्या सामर्थ्यानिशी ते फाडून तू आपला प्रताप सर्वांना दाखव. तुझ्या बाहूमध्ये राहून व तुला साह्य करून मी तुला विजयी करीन (व) तुझ्या शत्रूला मारीन. तुझ्या प्रतापाने माझे प्रतापगिरिजा हे नाव सर्व जगात सत्य ठरेल. तू (मनात) संशय न आणता जा. चिंता करू नको. तुझ्या वंशातील राजांना मी याप्रमाणेच पुढे(ही रक्षण करीन).

३१-३७ ''लढाईत मी तुला पुनःपुन्हा साहाय्य करून पालन करीन. मी कुठार (समजले तर) तुझा वंश हा त्याचा दंड आहे. दोघांच्या संयोगाने दैत्यरूपी वृक्षाचा नाश होईल. ही पृथ्वी दुष्टांच्या भाराने खिन्न होऊन शरण आली आहे त्यामुळे शिवाना मी आश्वासन दिले की त्या (दुष्टांचा) भाराचा मी संहार करीन. दुष्टांचा नाश आणि सज्जनांचे पालन करण्यासाठी मी या भूमीवर (येऊन) राहिले आहे, उत्तम कैलासालाही सोडून. याठिकाणी जे राजे पुढे कलियुगात होणार आहेत त्यांना मी ब्राह्मणादी धर्माच्या रक्षणासाठी शौर्य प्रदान करणार आहे. सत्त्वहीन

द्विजादिधर्मगुप्त्यर्थं तेषां वीर्यप्रदा त्वहम्।
गतसत्वा हीनबलाः षण्ढा निर्वीर्यतां गताः ।।३५
समरे भयभीताश्च कृशा दीना जडा धिया।
तेषां प्रतापसिद्ध्यर्थं प्रतापगिरिजेति च ।।३६
मयात्र प्रकटं नाम धृतम् अस्ति क्षितौ नृप।
नास्त्यन्या जयदा लोकान् मां विना देवता त्विह''।।३१
इति तं स्वप्नमध्ये सा गिरिजा प्राह सादरात्।
तच्छ्रुत्वा सकलं देव्या शिक्षितं स शिवोऽपि च।।३८
जाग्रदवस्थां संप्राप्तः स्वशिरोऽधोऽसितं वरम्।
कवचं च तथाऽभेद्यं ददर्श नृपसत्तमः ।।३९
ततोऽङ्गे कवचं धृत्वा गृहीत्वाऽसितम् उज्ज्वलम्।
नत्वा स्तुत्वा तु तां देवीं प्रतापाख्यां शिवः सुधीः ।।४०
ययौ स्वीयस्थलं वेगाद् आनन्दपरिपूरितः।
कथयामास सकलं वृत्तं स्वीयान् स्मयेन सः ।।४१

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
अफजलागमनं नाम पञ्चदशोऽध्यायः ।।१५



झालेले, बलहीन झालेले, आणि निर्वीर्य झालेले षंढ, लढाईत भिणारे, अशक्त, दीन, बुद्धीने जड असे जे असतील त्यांच्यात प्रताप आणण्यासाठी प्रतापगिरिजा असे नाव धारण करूनच पृथ्वीवर प्रकट झाले आहे. माझ्याखेरीज दुसरी कोणतीही देवता लोकांना जय मिळवून देणारी नाही.''

३८-४१ स्वप्नामध्ये असे गंभीरपणे गिरिजेने त्याला सांगितले. देवीने शिकविलेले ते सर्व ऐकून शिवाजीही जागा झाला. तेव्हा आपल्या उशाजवळ एक पांढरे, उत्तम, आणि अभेद्य कवच त्या श्रेष्ठ राजाला दिसले. त्या क्षणी कवच धारण करून आणि ते उज्ज्वल खड्ग घेऊन, देवीला नमन करून व तिची प्रार्थना करून आपल्या ठिकाणी वेगाने गेला, आणि त्याने आनंदभरित होऊन हा सर्व वृत्तांत आपल्या जवळच्यांना (थोड्याशा) अभिमानाने सांगितला.

'अफजलागमन' नावाचा पंधरावा अध्याय.

दीक्षित उवाच।

आहूतोऽफजलेनासौ शिवाजी गिरिजाज्ञया।
प्रययौ सेनया शीघ्रं विराटविषयं नृपः ॥१
वृक्षखण्डे पृथक् सेनां गोपयित्वा त्वितस्ततः।
ययौ अफजलं द्रष्टुं न तद्भीतिं वहन् हृदि ॥२
तस्यागमनम् आकर्ण्य स वीरोऽफजलोऽपि च।
निजसेनां वृक्षखण्डे स्वान्तिकं स्थाप्य यत्नतः ॥३
ययौ द्वित्र्यनुगैः साकं शिवाजीदर्शनोत्सुकः।
तथा द्वित्र्यनुगैः साकं शिवाजी बलगर्वितः ॥४
द्रष्टुं त्वफजलं वीरं प्रययौ तस्य संनिधम्।
परस्परं तयोर् आसीद् दर्शनं गह्वरे वने ॥५
अफजलः शिवं दृष्ट्वा सगर्वानम्रमस्तकम्।
अब्रवीद् हर्षयन् वाण्या तद्भीतिं हृदये वहन् ॥६
कथं धाष्र्ट्येन गर्वेण शिरसाऽनम्रितेन च।
मल्लवत् पुष्टदेहेन मां त्वं यास्यत्र चोद्धतः ॥७
तद्गिरं स समाकर्ण्य शिवाजी च शिवांशजः।
अब्रवीद् हर्षयन् वाण्या तदाफजलम् आदरात् ॥८
सर्वेषां मस्तकान्यत्र स्वबलान् नम्रितान्यहम्।
कर्तुकामः कथं कुर्यां स्वशिरो नम्रितं त्विदम् ॥९
इति तद् गर्वसंयुक्तं धाष्र्ट्यं वाक्यं भयावहम्।
श्रुत्वा सोऽफजलो वेगात् प्रसार्य स्वीयदोर्लताः ॥१०
तं समालिङ्गितुं तस्य पुरोऽगछत् तदन्तिकम्।
तं दृष्ट्वालिङ्गनोद्युक्तं शिवाजी स्वीयदोर्लताः ॥११
संप्रसार्यातिवेगेन प्रययौ तत्पुरस्तदा।
ततस्तौ पर्वताकारौ स्पर्शितौ च परस्परम् ॥१२
कक्षाभ्यां पृष्ठदेशे तु भुजौ निष्कास्य यत्नतः।
आलिङ्गनं चक्रतुस्तौ द्वौ शिवाफजलाह्वयौ ॥१३
तदा सोऽफजलो वेगात् जठरोर्ध्वस्थकञ्चुकात्।
निष्कास्य स्फ्यं महत्तीक्ष्णं तत्कुक्ष्यां रोपयत् खलः ॥१४
तदाङ्गं चञ्चलं कृत्वा शिवः कवचगोपितम्।
चकार विफलं तस्य समुद्योगं स्वलीलया ॥१५
ततः शिवोऽपि वेगेन स्वकरोर्ध्वस्थकञ्चुकात्।
पृष्ठदेशेनासितं तद् बहिर्निष्कास्य लीलया ॥१६
स्वरिपोः कुक्षिदेशे तु रोपयित्वा बलेन हि।
तदन्तर्जालं जठराद् बहिर्निष्कासयत् क्षणात् ॥१७



## १६. 'अफजलवध'

दीक्षित म्हणतात– १–६ शिवाजीला अफजलखानाने बोलाविले. गिरिजा (देवीच्या) आज्ञेप्रमाणे राजा सेनेसह शीघ्र विराट देशाकडे निघाला. जंगलात इकडे–तिकडे सेना (पसरवून) लपवून ठेवल्यावर मनात भीती न बाळगता तो अफजलखानाच्या भेटीला गेला. तो आल्याचे ऐकून शूर अफजलखानदेखील आपले सैन्य जंगलात आपल्याजवळच ठेवून दोन–तीन(च) अनुयायी बरोबर घेऊन शिवाजीला पाहण्याच्या उत्सुकतेने निघाला. बलाचा अभिमान धरून दोन–तीन(च) अनुयायी घेऊन शूर अफजलखानाला पाहण्यासाठी निघाला. दोघांची गहन वनात (गिरिकंदरात) जवळून भेट झाली. शिवाजीला पाहताच गर्वाने मस्तक न वाकविताना (मोठ्या) (हर्ष) आनंदाने अफजलखान त्याची भीती मनात वागवून म्हणाला–

७–१५ 'धीटपणाने व गर्वाने मस्तक न वाकविता मल्लाप्रमाणे पुष्ट देह असलेल्या माझ्याकडे (सर्व) शिष्टाचार सोडून कसा येतोस?' त्याचे हे बोलणे ऐकून शिवाच्या अंशावताराने अफजलखानाला (तितक्याच आदराने हर्षवीत उत्तर दिले– 'मी आपल्या सामर्थ्याने सर्वांचीच मस्तके नमविण्याची माझी इच्छा आहे. माझेच मस्तक मी कसे नमवीन?' त्याचे हे गर्वाचे, धीटपणाचे, (व) भय निर्माण करणारे वाक्य ऐकल्यावर अफजलखान झटकन आपले बाहू पसरून त्याला आलिंगन देण्यासाठी जवळ त्याच्या समोर आला. आलिंगन देऊ पाहणाऱ्या त्याला शिवाजीदेखील आपले बाहू पसरून जास्तच झटक्याने त्याच्या पुढे आला. त्या दोन पर्वताप्रमाणे (असलेल्या वीरांचा) परस्पर स्पर्श होताच बगलेतून पाठीच्या बाजूला प्रयत्नपूर्वक हात टाकून त्या दोघांनी परस्परांना अलिंगन दिले. तेव्हा दुष्ट अफजलखानाने त्वरेने पोटाच्या वर असलेल्या अंगरख्याच्या (भागातून) जंबिया बाहेर काढून अत्यंत तीक्ष्ण (जंबिया) त्याच्या (शिवाजीच्या) पोटात खुपसला. त्यावेळी शिवाजीने शरीर चंचल करून, ते कवचामुळे सुरक्षित असल्यामुळे त्याचा हा प्रयत्न सहजपणे विफल गेला.

१६–१९ त्यानंतर शिवाजीनेही त्वरेने आपल्या हाताच्या वरच्या (बाजूस) असलेल्या अंगरख्यातून पाठीमागच्या बाजूकडून, सहजपणे खड्ग बाहेर काढून शत्रूच्या पोटात बलपूर्वक खुपसले व त्याची आतडी पोटातून क्षणात बाहेर काढली. जावळी खोऱ्याच्या भूमीवर पर्वताप्रमाणे (अवाढव्य) असलेला अफजलखान डोळे सगळीकडे गरागरा फिरवीत

तदा सोऽफजलो भूमौ दशे जावलखोरजे।
न्यपतत् पर्वताकारो भ्रामयन् सर्वतोऽक्षिणी ।।१८
दितिजांशसमुद्भूतः शिवांशजनिताच्छिवात्।
मृतिम् आप महादुष्टो यवनोऽफजलाह्वयः ।।१९
भूम्यष्टशरभूम्यङ्कैर(१५८१) मिते श्रीशालिवाहजे।
शाके विकारिवर्षेऽत्र मार्गशीर्षसिते गुरौ ।।२०
सप्तम्यां चैव माध्याह्ने देशे जावलखोरजे।
दुर्गादत्तासितेनैव शिवेनाफजलो हतः ।।२१
वादयामास हर्षेण शिवाजी करतालिकाम्।
तत्पार्श्वसंस्थास्तद्दूता वादयामासुर् आदरात् ।।२२
हर्षेण महताविष्टास्तदा ते करतालिकाः।
वृक्षखण्डान्तरे लीनाः शतशस्ते शिवानुगाः ।।२३
परंपराक्रमेणैव शुश्रुवुः करतालिकाः।
तत्संज्ञालब्धहर्षास्ते जयं ज्ञात्वा शिवस्य हि ।।२४
शिवेन सूचिताः पूर्वं करतालिश्रुतिं प्रति।
करतालिश्रुतौ दत्तकर्णा आसन् सदैव ते ।।२५
शिवं संवेष्ट्यामासुश्चक्रुर् दुन्दुभिनिस्वनान्।
तदाफजलसेना सा सूचिता प्रययौ शिवम् ।।२६
ववर्षुः शरजालैस्तं शस्त्रैः संछादयन् खलाः।
तदा शिवप्रतापोग्रदावानलविभर्जिताः ।।२७
ते सर्वे छिन्नभिन्नाङ्गा मृतिं संलेभिरेऽखिलाः।
शेषाः पलायनं चक्रुश्चैदिलं ते समागताः ।।२८
एदिलस्तद्यथावृत्तं सर्वं श्रुत्वा सविस्तरम्।
श्रावयामास दूतास्यैर अवरञ्जेबपार्थिवम् ।।२९
श्रुत्वाफजलवीरस्य मृतिं तेषां मुखेन सः।
अतिम्लानाननश्चासीद् अवरं(जे)बपार्थिवः ।।३०
वदन् हाहेति वाक्यानि हृदि संताडयन् मुहुः।
मेने शिवप्रतापोग्रं स्वापकर्षं व्यचिन्तयत् ।।३१
शिवोऽपि विजयं लब्ध्वा महादुन्दुभिनिस्वनैः।
स्तुतिभिर् वीरवर्याणां विप्राणाम् आशिभिः शनैः ।।३२
ययौ प्रतापदुर्गां तां स्तुत्वा पुनः पुनः।
तत्प्रसादं पुनर्लब्ध्वा जगाम स्वस्थलं प्रति ।।३३
एवं प्रतापदुर्गायाः प्रतापात् स शिवो मुहुः।
विजित्य यवनाग्रगण्यान् सुखं तस्थौ मुदान्वितः ।।३४
इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
अफजलवधो नाम षोडशोऽध्यायः ।।१६



पडला. अफजल नावाचा (तो) दैत्याचा अंश असलेला महादुष्ट यवन शिवाचा अंशावतार अशा शिवाजीमुळे मेला.

२०-२१ भूम्यष्टशरभू म्हणजे १८८१ या शालिवाहन शकाच्या विकारी संवत्सरात मार्गशीर्ष शुक्ल सप्तमीला गुरुवारी मध्यान्हाला जावळीच्या खोऱ्यात दुर्गा (देवीने) दिलेल्या खड्गानेच शिवाजीने अफझलाचा वध केला.

२२-२८ शिवाजीने आनंदाने टाळी वाजविली, व (त्यानुसार) हर्षाने त्याच्या (आजू-)बाजूला असलेल्या दूतांनीही टाळ्या वाजविल्या. जंगलात लपलेल्या शिवाजीच्या शेकडो अनुयायांनी मोठ्या हर्षाने भारून जाऊन टाळ्या वाजविल्या. क्रमाक्रमाने टाळ्या वाजविलेल्या (चहू बाजूंनी) ऐकू येऊ लागल्या. शिवाजीचा जय झाल्याचे त्या संकेताने समजून त्या सर्वांना आनंद झाला. टाळीच्या बाबतीत पूर्वी शिवाजीने सूचना दिल्यावरून ते सर्व (अनुयायी) टाळी (केव्हा) कानी पडते याविषयी कान लावून (दक्ष) होते. (त्यांनी) शिवाजीला घेरले, नगारे वाजविले. अफजलखानाच्या सैन्याला (ती) सूचना मिळाली, व ते शिवाजीकडे धावून आले. त्या दुष्टांनी बाणांचा वर्षाव करून त्याला शस्त्रांनी (जणू) झाकून टाकले. तेव्हा प्रतापाने (निर्माण झालेल्या) उग्र वणव्यात भाजून निघालेले ते सर्व शरीर छिन्नभिन्न होऊन मरण पावले. उरलेले पळून गेले व अदिलखानाकडे आले.

२९- आदिलखानाने ते सर्व वृत्त सविस्तर ऐकल्यावर दूतमुखाने ते औरंगजेबास कळविले. अफजला(सारख्या) वीराचे मरण दूतांच्या मुखातून ऐकताच आरंगजेबाचे मुख अत्यंत म्लान झाले.

३१- हा हा असे उद्गार काढत व पुनःपुन्हा छाती बडवीत तो शिवाजीच्या प्रतापाने आपला मोठाच अपकर्ष झाला असे मानू लागला. आणि शिवाजीही विजय मिळताच मोठाल्या चौघड्यांच्या निनादाने, शूरांच्या स्तुतीने, (आणि) ब्राह्मणांच्या आशीर्वादाने प्रतापदुर्गेचे स्तवन करीत व तिला वंदन करीत व पुनः तिची प्रसन्नता पुनः(एकदा) अनुभवीत आपल्या मुक्कामावर परत आला.

याप्रमाणे प्रतापदुर्गेच्या प्रतापाने शिवाजी पुनः मुख्य यवनांवर विजय मिळवून आनंदाने स्वस्थ राहिला.

'अफजलवध' नावाचा सोळावा अध्याय.

दीक्षित उवाच।
त्वद्दर्शनात् पूर्वमेव शाहूप्राणप्रियेऽनघे।
गत्वा यात्राप्रसंगेन प्रतापगिरिजा मया।।१
दृष्टार्चिता स्तुता स्तुत्या तच्छ्रुतिं श्रोतुम् अर्हसि।
यस्याः श्रवणमात्रेण सर्वान् कामान् लभेन् नरः।।२
सद्भक्तसंतापविघातकारिणीं दैवभक्तेप्सितकामपूरिणीम्।
दीनार्तसंरक्षणशीलशालिनीं प्रतापदुर्गां शिरसा नमाम्यहम्।।३
दुर्गासुखप्राणविनाशकारिणीं निकुम्भकुम्भादिकदैत्यमर्दिनीम्।
सद्भक्तसंरक्षणकर्मकारिणीं प्रतापदुर्गां शिरसा नमाम्यहम्।।४
उत्फुल्लकंजायतपत्रलोचनां दिव्याङ्गयष्टिं शुकनासिकां वराम्।
हेमस्वरूपां मृगतुल्यचञ्चलां प्रतापदुर्गां शिरसानमाम्यहम्।।५
श्रीशंकरप्राणविलासकारिणीं श्रीकार्तिकेयाननजन्मदायिनीम्।
नन्दीश्वरेणापि सदा विभाविनीं प्रतापदुर्गां शिरसा नमाम्यहम्।।६
चन्द्राननां चञ्चलमीनलोचनां चापभ्रुवां कुन्तलशामलालकाम्।
सिंहोपमासूक्ष्मकटिं मनोरमां प्रतापदुर्गां शिरसा नमाम्यहम्।।७
रक्तोत्पलारक्तकरां मनोहराम् आलक्तरक्ताङ्कितपादकोमलाम्।
उत्तुङ्गपीनस्तनभारमालिनीं प्रतापदुर्गां शिरसा नमाम्यहम्।।८
विद्युत्स्वरूपां वरगण्डभास्वरां प्रवालमुक्ताभरणैः सुशोभिताम्।
कस्तूरिकाकुङ्कुमरागरञ्जितां प्रतापदुर्गां शिरसा नमाम्यहम्।।९
अनेकपुष्पाङ्कितमालिकान्वितां सुगन्धलिप्ताङ्गसुधूपितालकाम्।
सूर्योपमां भक्तजनैकपालकां प्रतापदुर्गां शिरसा नमाम्यहम्।।१०
प्रतापदुर्गाष्टकम् एतद् उत्तमं सदाव्रती दीक्षितमतं त्विदम्।
पठन्ति गायन्ति च कीर्तयन्ति तान् प्रतापदुर्गा प्रतिपालयेत् सदा।।११
इति स्तुत्या स्तुता दुर्गा मया पूर्वं नृपप्रिये।
तदानयातिसंतुष्टा सा दुर्गासीन् म मोपरि।।१२
साब्रवीत् स्वप्नमध्ये मां ''त्वां तुष्टास्म्यद्य दीक्षित।
काव्यशक्तिर्मया दत्ता तव क्वाप्यस्त्वकुण्ठिता।।१३
सहस्रावधिविप्राणां प्रत्यहं भोजनार्पणे।
प्रपादानेऽरण्यमध्ये निर्जले शक्तिर् अस्तु ते।।१४
कल्पनाकरणे शक्तिर् व्यासवत् सर्वदास्तु ते।
सहस्रावधिमुद्राणाम् अर्जने यज्ञकर्मणि।।१५
सर्वतीर्थावगाहार्थं चान्द्रायणव्रतादिषु।
पारायणानां पठने रोगिनीरोगमोचने।।१६
भिषक्शास्त्रकला शक्तिः पुराणरचनादिषु।
धर्मशास्त्रे छन्दशास्त्रे नानाकौशल्यकर्मणि।।१७



## १७. 'प्रतापदुर्गास्तुति'

दीक्षित म्हणतात- १-२- राणीसाहेब! आपल्या दर्शनाच्या अगोदरच (तीर्थ)यात्रेच्या निमित्ताने मी प्रतापगिरिजेचे दर्शन घेतले होते, पूजा केली होती, आणि स्तुतीही केली होती. ती स्तुति आपण ऐकावी. ती ऐकताच मनुष्याच्या सर्व कामनांची पूर्ती होते. स्तोत्र-

३-११ ''प्रतापदुर्गे! मी तुला शिरसावंदन करतो. तू सद्भक्तांचा संताप घालविणारी, सदैव भक्तांच्या इच्छा पूर्ण करणारी, (आणि) दीन-दुःखितांचे रक्षण करण्याच्या व्रताने शोभणारी आहेस. असुरांचा प्राणविनाश करणारी, कुंभ-निकुंभादिक दैत्यांचे मर्दन करणारी, सद्भक्तांचे रक्षणकार्य करणारी आहेस. विकसित कमलाच्या पत्राप्रमाणे लांब नेत्र असणारी, दिव्य शरीरयष्टी असलेली, उत्तम पोपटाप्रमाणे (टोकदार) नाक असलेली, सोनेरी हरणाप्रमाणे चंचल (चपळ) आहेस. श्रीशंकराचा प्राणविलासच, कार्तिक व गजानन यांना जन्म देणारी, नंदीश्वरानेही नित्य स्तुती केलेली अशी आहेस. चंद्रमुखी, चंचल माशाप्रमाणे (सुंदर) नेत्रांची, बाणाप्रमाणे (वक्र) भुवया असलेली, कुरळे आणि काळे केस असलेली, सिंहाप्रमाणे बारीक कंबर असलेली, अशी मनाला भुरळ घालणारी आहेस. तांबड्या कमलाप्रमाणे आरक्त हातांची मनोहर अळत्याच्या लाल (द्रवाने) कोमल पाय अंकित झालेली, उत्तुंग आणि भरदार स्तनभाराने शोभणारी आहेस. विजेचे (प्रकाशमान) रूप असलेली, उत्तम गालामुळे तेजस्वी असणारी, प्रवाळ आणि मोती यांच्या अलंकारांनी शोभणारी, (आणि) कस्तुरी व कुंकुम यांनी रंजित अशी आहेस. अनेक फुलांच्या माळा धारण करणारी, सुगंध लावल्यामुळे धूपित झालेल्या केसांची, सूर्याप्रमाणे (तेजस्वी), व भक्तजनांचे सर्वस्वी पालन करणारी आहेस. हे सदाव्रती दीक्षिताने केलेले उत्तम प्रतापदुर्गाष्टक जे वाचतात, गातात, आणि वर्णितात त्यांचे प्रतापदुर्गा सतत रक्षण करो.''

१२-१६ राणीसाहेब! या स्तोत्राने मी पूर्वी दुर्गेची स्तुती केली. त्यामुळे ती दुर्गा माझ्यावर अत्यंत संतुष्ट आहे. तिने स्वप्नात मला (एकदा) सांगितले की ''दीक्षितजी! आज मी तुमच्यावर संतुष्ट झाले आहे. मी तुम्हाला कोठेही कुंठित न होणारी काव्यशक्ती दिली आहे. सहस्रावधी ब्राह्मणांना रोज भोजन मिळवून देणारी, निर्जल अरण्यात(ही) पाणपोई निर्माण करणारी, सदैव व्यासांप्रमाणे कल्पनाशक्ती, यज्ञकर्मात सहस्रावधी मुद्रा मिळवून देणारी, सर्व तीर्थांचे स्नान घडण्यासाठी चांद्रायणादी व्रतांमध्ये, पारायणांच्या वाचनात, रोगी लोकांना

श्रौतस्मार्तसदाचारे शिष्याणां पाठनादिषु।
त्वयि शक्तिर्मया दत्ता प्रतापस्तेस्तु सर्वतः ।।१८
शाहूराज्ञयाज्ञया मेऽग्रे माहात्म्यं त्वं वदिष्यसि।
भविष्यति त्वयि प्रीतिः सुकुमाराहृदन्तरे ।।१९
इति स्वप्नेऽब्रवीद् देवी प्रतापगिरिजा मम।''
तद्वाक्यात् सर्वमेवासीन् मयि यद्यत् तयेरितम् ।।२०
त्रिवारं दर्शनं तस्या ममासीत् पूर्वमेव हि।
पुत्रपुत्रीरमाकीर्तिः सर्वं माम् अस्ति देवितः ।।२१
तयैव मन्मुखे स्थित्वा निजमाहात्म्यम् ईरितम्।
नो चेत् कथं मयि ज्ञानं तन्माहात्म्यं निवेदितुम् ।।२२
तया त्वं हृदये राज्ञि प्रविश्याज्ञापितं मम।
वर्णितुं निजमाहात्म्यं नो चेत् तुभ्यं कथं मतिः ।।२३
यत्किंचिन् न्यूनमत्रास्ति पण्डितदृष्टिगोचरम्।
मयि मूढे कृपां कृत्वा पूरणीय हिताद् धिया ।।२४
यथामत्या मया चेदं कृतमस्त्यत्र वर्णनम्।
मयि दोषावरोपोऽत्र न कार्यः पण्डितादिभिः ।।२५
अपशब्दाः शतं माघे किराते तु शतत्रयम्।
रघुवंशे न गण्यन्ते तत्र का गणनास्य सा ।।२६
नृपस्य वाथ वेश्यायाः राजपत्न्या नरस्य वा।
उदराभरणार्थाय न मयेयं स्तुतिः कृता ।।२७
प्रतापदेवीमाहात्म्यप्रसंगादेतम् एवमीरितम्।
शिवाफजलयोर् अत्र चरित्रं तन् मनोहरम् ।।२८
प्रसंगाद् अवरञ्जेबराजवृत्तं निवेदितम्।
क्षन्तव्यं सकलं सर्वं पण्डितैः साधुभिस्त्विदम् ।।२९
गुणानां ग्रहणं कुर्युः साधवो नोऽगुणग्रहम्।
हंसो गृह्णाति तत् क्षीरं यथा त्यजति तज्जलम् ।।३०
निजापराधं क्षमितुं शतवारं पुनःपुनः।
शिरसा नमनं कृत्वा प्रार्थयाम्यहमादरात् ।।३१
अष्टादशवराध्यायैस्तुष्टा त्वं चेद् भविष्यसि।
पण्डिता अपि तुष्टाश्चेद भविष्यन्त्यस्य संश्रवात् ।।३२
वन्मां त्त्वं वदिष्यसि।
सहस्राध्यायपर्यंतं चेदायुर्विपुलं भवेत् ।।३३

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
प्रतापदुर्गास्तुतिः नाम सप्तदशोऽध्यायः ।।१७



रोगांपासून मुक्त करणारी अशी शक्ती तुम्हाला मिळो.

१७-१९ वैद्यकशास्त्र कलेत, पुराणरचनेत, धर्मशास्त्रात, छंदशास्त्रात, नाना (कलांच्या) कौशल्यात, श्रौत-स्मार्त आचरणात, शिष्यांना पठविण्यात तुला सामर्थ्य दिले आहे. सर्व बाजूंनी तुझा प्रताप गाजो. शाहूच्या राणीच्या आज्ञेने तू पुढे माझे माहात्म्य सांगशील, आणि सकवारबाईच्या मनात तुझ्याबद्दल प्रेम निर्माण होईल.''

२०-२३ याप्रमाणे प्रतापगिरिजा देवीने मला स्वप्नात सांगितले. तिने जे जे सांगितले ते सर्व तसेच झाले आहे. पूर्वी मला तिचे तीन वेळा दर्शन घडले. देवीमुळे माझ्याजवळ कन्या-पुत्र-पत्नी- आणि कीर्ती सर्व आहे. तिनेच माझ्या मुखात राहून आपले माहात्म्य प्रकट केले, नाहीतर तिचे माहात्म्य निवेदन करण्याइतके ज्ञान मला कसे (असणार)? राणीसाहेब! तिनेच आपल्या हृदयात प्रवेश करून आपले माहात्म्य वर्णन करण्यास मला आज्ञा दिली, नाहीतर आपल्याला तरी तशी बुद्धी कशी होणार?

२४-३२ जे काही न्यून या ठिकाणी पंडितांना दृष्टिगोचर होईल ते, हे देवी, मज मूढावर कृपा करून तू आपल्या बुद्धीने पूर्ण कर. माझ्या मतीनुसार मी हे वर्णन केले आहे. पंडित लोकांकडून माझ्यावर दोषारोपण न होवो. माघ (काव्यात) शंभर अपशब्द आहेत, किरात (काव्यात) ते तीनशे(पर्यंत) आहेत, आणि रघुवंशातील शब्ददोषांची तर गणनाच नाही, तेव्हा माझी काय गती? मी ही स्तुती राजाची, वेश्येची, राणीची, वा (सामान्य) माणसाची उदरभरणाच्या हेतूने केलेली नाही. प्रतापदेवीच्या माहात्म्याच्या अनुषंगाने शिवाजी आणि अफजल यांचे द्वंद्व मी वर्णिले ते मनोहर आहे. त्याच अनुषंगाने मी औरंगजेब राजाचीही हकिकत सांगितली. पंडित आणि साधुजन या सर्व (कथनासाठी) मला क्षमा करोत. गुण (असतील त्यांचा) स्वीकार करोत. साधुजनांनी (आमच्या) दोषांचे ग्रहण करू नये. हंस ज्याप्रमाणे दूध घेऊन पाणी टाकून देतो (त्याप्रमाणेच पंडित करोत). अत्यंत गांभीर्याने शिर नमवून 'माझे अपराध क्षमा करावेत' असे मी शतशः पुनःपुन्हा विनवितो. अठरा अध्यायांनी, हे देवी, तुला संतोष होत असेल तर पंडितांनादेखील त्यांच्या श्रवणाने संतोष होईल. (तू म्हणशील तर माझे लेखन सहस्र अध्यायांइतके विपुल होईल.)

'प्रतापदुर्गास्तुति' नावाचा सतरावा अध्याय.

दीक्षित उवाच।
अधुनाहं प्रवक्ष्यामि माहात्म्यस्य फलश्रुतिम्।
अनुष्ठानप्रकारांश्च कालांश्च श्रवणस्य च।।१
इदं प्रतापदुर्गाया माहात्म्यं परमं महत्।
अतिपुण्यतमं श्रेष्ठं श्रवणान् मङ्गलप्रदम्।।२
अष्टादशवराध्यायैः सुश्लोकैः सार्धषट्शतैः।
प्रतापदेव्या माहात्म्यं मन्त्रात्मकमिदं महत्।।३
जपनीयं प्रयत्नेन महामङ्गलकारकम्।
लक्ष्मीसौख्यप्रदं नृणां पुत्रपौत्रप्रवर्धनम्।।४
नातः परतरो मन्त्रो नातः परतरो जपः।
नातः परतरं किंचिद् अन्यद् अस्तीह भूतले।।५
एककालं द्विकालं वा त्रिकालं यः पठेन् नरः।
तस्य प्रतापदुर्गेयं प्रसन्नेप्सितमर्पयेत्।।६
पुत्रार्थिना त्विदं जप्यं जप्यं पत्न्यर्थिना त्विदम्।
धनार्थिना त्विदं जप्यं जप्यं कामार्थिना त्विदम्।।७
एकाध्यायं पठेद् आदौ प्रथमेऽहन पावनम्।
द्वितीये दिवसेऽध्यायौ पठनीयौ द्वावि
अष्टादशदिनं वृद्ध्या पठेद् एतत् क्रमेण हि।
एकैकह्रासतश्चाग्रे पठेत् सप्तदशाहतः।।९
पञ्चत्रिंशद्दिनैर् एतद् पठनीयं प्रयत्नतः।
अनेन कार्यसिद्धिः स्याद् यां याम् इच्छति मानवः।।१०
अथवा प्रथमे चाह्नि माहात्म्यं सकलं पठेत्।
द्विवारं च द्वितीयेऽह्नि तृतीयेह्नि त्रिवारतः।।११
चतुर्थेऽह्नि द्विवारं च पञ्चमेऽह्नि पठेत् सकृत्।
सप्तावृत्या त्वेवमेव पठनीयं हि पूर्ववत्।।१२
पञ्चत्रिंशद्दिनैर् एतद् अनुष्ठानं सुसिद्धिदम्।
त्रिषष्टिवारं जायन्ते पाठाः सप्तावृत्तिस्थिताः।।१३
पाठम् उक्ताफलानां च पेटिकासूत्रम् उत्तमम्।
त्रिषष्टिपाठमुक्ताभिः पठनान् मङ्गलप्रदम्।।१४
सूत्रमुक्ताफलान्येव सुगुम्फनैः।
भवान्या पेटिकासूत्रं भवेत् तद्दृष्टिगोचरम्।।१५
भवान्या पेटिकासूत्रक्रमेणेदं पठ
प्रतापगिरिजार्पयेत्।।१६
सूत्रत्रिपल्लवैर् एकं सूत्रं संपीडनैर् दृढम्।
एवं तत्सूत्रषट्कं च कर्तव्यं हस्तमात्रतः।।१७



## १८. 'अनुष्ठानप्रकारनिरूपण'

दीक्षित म्हणतात- १-५ आता मी माहात्म्याची फलश्रुती सांगतो. अनुष्ठानाचा प्रकार, (अनुष्ठानाचा) काल, आणि श्रवणाचे (फलही सांगतो). प्रतापदुर्गेचे हे माहात्म्य मोठे, श्रेष्ठ, अतिपावन, आणि श्रवण केल्याने मंगल करणारे आहे. अठरा सुंदर अध्यायांनी, साडेसहाशे श्लोकांनी हे प्रतापदेवीचे माहात्म्य मंत्रात्मक बनलेले आहे. महामंगलकारक असे माहात्म्य प्रयत्नपूर्वक जप करण्यासारखे आहे. लक्ष्मीसौख्य देणारे, आणि मनुष्यांना पुत्रपौत्रवर्धक असे आहे. यापेक्षा श्रेष्ठ मंत्रही नाही, आणि जपही नाही (किंबहुना) सर्व पृथ्वीवर यापेक्षा (श्रेष्ठ) असे काहीही नाही.

६-७ जो मनुष्य (दिवसातून) एकदा, दोनदा, किंवा तीन वेळा हे वाचील त्यावर प्रतापदुर्गा प्रसन्न होऊन त्याला त्याचे इच्छित (मिळवून) देईल. पुत्रार्थी माणसाने याचा जप करावा, भार्या पाहिजे असेल त्याने जप करावा, धन हवे असेल त्याने जप करावा, कोणतीही इच्छा असेल त्यानेही हे पठण करावे.

८-१० पहिल्या दिवशी याचा पावन असा पहिला अध्याय अगोदर वाचावा. दुसऱ्या दिवशी दोन अध्याय वाचावेत. अशा क्रमाने अठरा दिवसांपर्यंत (रोज अध्यायसंख्येत) वाढ करीत जाऊन नंतर पुढच्या सतरा दिवसांत एकेक अध्याय कमी करीत वाचावे. याप्रमाणे पस्तीस दिवसांत प्रयत्नपूर्वक याचा पाठ करावा. त्यामुळे मनुष्याला जी जी इच्छा असेल ते ते कार्य सिद्ध होते.

११-१५ किंवा पहिल्या दिवशी सकल माहात्म्य वाचावे. दुसऱ्या दिवशी दोन वेळा, तिसऱ्या दिवशी तीन वेळा, चौथ्या दिवशी दोनदा, पाचव्या दिवशी एकदा वाचावे. याप्रमाणे सात वेळा ते वाचावे. पस्तीस दिवसांचे हे अनुष्ठान उत्तम सिद्धी देणारे आहे. सात वेळा केलेल्या आवृत्तीमध्ये त्रेसष्ट पाठ होतात. या सांगितलेल्या पाठांचे उत्तम पेटिकासूत्र बनते, व सांगितलेल्या त्रेसष्ट वेळा केलेल्या पाठामुळे (हे माहात्म्य) मंगलदायक बनते. सांगितलेली फले चांगली गुंफल्यावर हे सूत्र भवानी (देवीचे) पेटिकासूत्र बनते असे समजून (येईल).

१६-२३ भवानीच्या या पेटिकासूत्राच्या क्रमाने वाचावे, व प्रतापगिरिजेला अर्पण करावे. सूत्रांच्या तीन 'पानांनी' एकत्र करून एक दृढ सूत्र बनते. अशा प्रकारे सहा सूत्रे फक्त हातानेच(?) करावीत. अठ्ठावीस (तोळे ?) सोन्याचे चांगले

अष्टाविंशत्सुवर्णेन कर्तव्या मणयः शुभाः।
मुक्ताफलानि तावन्ति मणितुल्यानि तान्यपि ॥१८
रक्तमाणिक्यसंयुक्ताः पेटिकाः सप्त हेमजाः।
त्रिषष्टिर् एवं संपाद्य सूत्रैर् बन्धं प्रकारयेत् ॥१९
सूत्रषट्के मणिः पूर्वश्चोर्ध्वं मुक्ता त्रितन्तुभिः।
अधो मुक्ता त्रिभिः सूत्रैश्चोर्ध्वं द्वाभ्यां पुनर् मणिः ॥२०
माणिक्यपेटिकामध्ये द्वाभ्यां द्वाभ्याम् अधोमणिः।
पुनर् मुक्ताफले द्वेऽत्र पृथक् सूत्रं त्रिभिर् न्यसेत् ॥२१
सूत्रषट्के मणिश्चान्त्यस्त्वित्यैका पेटिका स्मृता।
एवं ताः सप्त कर्तव्याः पेटिकाः पूर्ववत् क्रमात् ॥२२
भवान्याः पेटिकासूत्रबन्धस्त्वेवं प्रकारयेत्।
पेटिकासप्तभिश्चैवं पेटिकासूत्रम् उच्यते ॥२३
इदं दृग्गोचरं कृत्वा पश्चात् तद्वत् पठेद् इदम्।
पञ्चत्रिंशद्दिनैः साध्यं महत्कार्यार्थम् ईरितम् ॥२४
अथवा कवचं पूर्वं प्रथमेऽहनि तत् पठेत्।
द्वितीयेऽह्नि द्विवारं च नाम्नाम् अष्टोत्तरं शतम् ॥२५
तृतीये दिवसे पूर्वं कवचं देविजं पठेत्।
ततः सर्वं तु माहात्म्यं पठेत् तत्कवचं पुनः ॥२६
चतुर्थेऽह्नि द्विवारं च नाम्नाम् अष्टोत्तरं शतम्।
पंचमं कवचं चाह्नि पठेद् एवं पुनः पुनः ॥२७
सप्तावृत्त्या पठेत् चात्र महत् मङ्गलसिद्धिदम्।
पञ्चत्रिंशद्दिनैर् एवं प्रकारान्तरम् ईरितम् ॥२८
उत्सवे व्रतबन्धेऽपि विवाहे मङ्गलादिषु।
अयने विषुवे यज्ञे चन्द्रसूर्यग्रहे तथा ॥२९
रणे वादे व्यतीपाते पौर्णिमायां हरेर् दिने।
श्राद्धकाले पर्वकाले जयन्त्यां नवरात्रके ॥३०
अपस्मारे महारोगे संबन्धपरिमुक्तये।
पठनीयं प्रयत्नेन प्रोक्षयेत् कुशकूर्चतः ॥३१
अष्टादश व्रीहिपुञ्जाः कार्यास्तेषु कुमारितः।
पूगीफलत्रयं न्यस्य शकुनोऽयं परीक्षयेत् ॥३२
अध्यायश्चाद्यपूगेन दशभिश्च द्वितीयतः।
श्लोकस्तृतीयतो दृश्यः कार्याकार्यं तदर्थतः ॥३३

इति श्रीभविष्येऽखिले सह्याद्रिखण्डे प्रतापदुर्गामाहात्म्ये
अनुष्ठानप्रकारनिरूपणं नाम अष्टादशोऽध्यायः ॥१८



मणी बनवावे. तितकेच मोती (घ्यावेत), लाल माणिक्यांसह सात सोन्याच्या पेट्या कराव्यात. त्रेसष्ट सूत्रांनी मिळून एक बंध होतो. सहा सूत्रांत मणी, तीन तंतूंनी त्यावर मोती, तीन सूत्रांनी खाली मोती, आणि त्यावर दोन सूत्रांनी पुनः मणी (ठेवावा). माणिक्याच्या पेटिकेत खालच्या बाजूला दोन-दोन मणी, पुनः दोन मोती, अशा रीतीने तीन (पेटिकांचे?) एक स्वतंत्र सूत्र तयार होते. सहा सूत्रांत शेवटी मणी, अशी एक पेटी होते. पूर्वीच्याच क्रमाने अशा सात पेट्या कराव्यात. देवीचा पेटिका सूत्रबंध अशा प्रकारचा आहे. सात पेट्यांचा (मिळून) एक पेटिकासूत्र सांगितले आहे.

२४-२८ हे सर्व लक्षात घेऊन नंतर त्याप्रमाणे हे (माहात्म्य) वाचावे. मोठे कार्य (सिद्ध) करण्यासाठी पस्तीस दिवसांनी हे साध्य होते असे म्हटले आहे. किंवा पहिल्या दिवशी अगोदर कवचाचा पाठ करावा. दुसऱ्या दिवशी दोन वेळा आणि एकशे आठ नामांचा पाठ. तिसऱ्या दिवशी अगोदर देवीचे कवच वाचावे. नंतर सर्व माहात्म्य वाचावे व कवच पुनः (एकदा) वाचावे. चौथ्या दिवशी दोन वेळा एकशेआठ नामांचा (पाठ), पाचव्या दिवशी कवच, याप्रमाणे पुनःपुन्हा वाचावे. सात आवृत्त्यांचा पाठ झाल्यावर हे मोठे (माहात्म्य) मंगल सिद्धी करवून देते. पस्तीस दिवसांचा हा वेगळा प्रकार सांगितला आहे.

२९ उत्सवात, मुंजीत, विवाहात, मंगलकार्यात, अयन व विषुव दिवशी, यज्ञात, चंद्र-सूर्य-ग्रहणात, लढाईत, वादविवादात, व्यतीपाताचे (दिवशी), पौर्णिमेला, एकादशीला, श्राद्धकाली, पर्वकाली, जयंती (दिवशी), नवरात्रात, अपस्मार आणि महारोगे झाला तर त्यातून सुटण्यासाठी याचा प्रयत्नाने पाठ करावा, (व) दर्भाच्या कूर्चाने प्रोक्षण करावे. तांदळाचे अठरा पुंजके (ढिगारे) करावे. त्यावर कुमारिकेकडून (?) तीन सुपाऱ्या ठेवून याचा शकून पाहावा. पहिल्या सुपारीने अध्याय, दुसऱ्या (सुपारीने) दहा, आणि तिसऱ्या (सुपारीने) श्लोक पाहावा (?) व कार्याकार्य त्यावरून (निश्चित करावे).

'अनुष्ठानप्रकारनिरूपण' नावाचा अठरावा अध्याय.



## लेखक परिचय

**डॉ. सदाशिव सखाराम शिवदे**
'वैष्णतेज', सुंदरबन सोसायटी, नवी पेठ पुणे-४११०३०
शिक्षण : पशुवैद्यक पदविका (D.Vet.), एम.ए.(मराठी), एम.ए.(इतिहास), पीएच.डी.(इतिहास/संस्कृत)
Fellow of United Writers Association.
फोन नं. : ०२०-२४५३४२२१

**ग्रंथलेखन :** १. ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा (संशोधनात्मक ग्रंथ), २. महाराज्ञी येसूबाई (संशोधनात्मक ग्रंथ), ३. रणरागिणी ताराराणी (संशोधनात्मक ग्रंथ), ४. दर्याराज कान्होजी आंग्रे (संशोधनात्मक ग्रंथ), ५. सेनापती हंबीरराव मोहिते (संशोधनात्मक ग्रंथ), ६. माझी गुरं; माझी माणसं (ग्रामीण कथासंग्रह), ७. शिवपत्नी सईबाई (ऐतिहासिक कांदबरी), ८. सेनापती प्रतापराव गुजर (संशोधनात्मक ग्रंथ), ९. छ. राजाराम महाराणी ताराराणी, १०. मराठ्यांचे लष्करी प्रशासन (अनुवाद), ११. परमानन्दकाव्यम् (अनुवाद), १२. प्रतापदुर्गा माहात्म्य

**पुरस्कार :** ज्वलज्ज्वलनतेजस संभाजीराजा या ग्रंथास महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ऐतिहासिक चरित्र ग्रंथ १. 'महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार पुरस्कार', २. 'रा. ना. नातू पुरस्कार', ३. महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था पुणे यांचा संदर्भ ग्रंथ 'शारंगपाणी पुरस्कार', ४. महाराज्ञी येसूबाई या ग्रंथास 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था पुरस्कार', ५. पुणे महानगरपालिका 'गौरव पदक' (उत्कृष्ट ऐतिहासिक ग्रंथनिर्मिती), ६. कै. मणीभाई देसाई प्रतिष्ठानचा 'राष्ट्रीय सेवा पुरस्कार', ७. संभाजी स्मृती समितीचा 'श्रीशंभूसेवा पुरस्कार', ८. सुखकर्ता सांस्कृतिक प्रतिष्ठानचा 'सुखकर्ता पुरस्कार व मानपत्र', ९. पर्वती पुण्यभूषण पुरस्कार, १०. श्रमशक्ति देशव्यापी पुरस्कार मुंबई, ११. दर्याराज कान्होजी आंग्रे ग्रंथास 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था पुरस्कार', १२. संगमनेर इतिहास संशोधक मंडळाचा कवी अनंत फंदी पुरस्कार २००८

**शोधनिबंध :** १. अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेच्या अधिवेशनात व भारत इतिहास संशोधक मंडळात शोधनिबंध वाचन व प्रसिद्धी, २. आंतरराष्ट्रीय इतिहास परिषदेत शोधनिबंध, ३. अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेचे शोधनिबंध संपादक संचालक.

**व्याख्याने :** छ. संभाजी, महाराणी येसूबाई, शिवपत्नी सईबाई या विषयांवर महाविद्यालये, सार्वजनिक संस्थांमधून व्याख्याने.

**संस्था सहभाग :** १. अखिल महाराष्ट्र इतिहास परिषद - उपकार्यवाह, २. जनसेवा फौंडेशन, पुणे - कार्यकारिणी सदस्य, ३. भारत इतिहास संशोधक मंडळ - ग्रंथालय सदस्य, ४. महाराष्ट्र साहित्य परिषद - आजीव सदस्य सहकार्यवाह, ५. महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था - आजीव सदस्य, ६. मरिमाता देवस्थान ट्रस्ट मोडवे - विश्वस्त ७. धन्वंतरी ट्रस्ट, लोणंद - विश्वस्त, ८. लायन्स क्लब, औंध-पाषाण - सदस्य.

# हे प्रतापगडच्या जगदंबे !

हे चंडमुंडभंडासुरखंडिनी दुर्गे, हे उद्दंडदंडमहिषासुरमर्दिनी अंबिके, हे अहिमहिदैत्यासुरनिर्दलिनी चंडिके, प्रतापगडनिवासिनी रामवरदायिनी दुर्गे, उदयोस्तु ! जगदंबे उदयोस्तु !

श्रीशिवरायांना तूंच आशीर्वाद दिलेस. या महाराष्ट्राच्या गडदुर्गांना तूंच वज्रसामर्थ्य दिलेस. हिंदवी स्वराज्याच्या अश्वदळांना तूंच सूर्याच्या सप्तअश्वांची निधडी शक्ति दिलीस. हंबीरराव मोहिते, प्रतापराव गुजर, खंडेराव दाभाडे यांच्यासारख्या सरसेनानींना तूंच यशवंत केलेस. हे जगदंबे, तेच सामर्थ्य तू आज आम्हांला दे. आमच्या शब्दांना तुझ्या तलवारीची धार दे. आमच्या प्रतिभेला अमृताच्याही पैजा जिंकण्याचे संजीवन दे. या मराठीला जागरण घालण्यासाठी पुन्हा एकदा ज्ञानेश्वरी दे. नदीच्या डोहात न बुडता कमळासारखा फुलून येणारा श्रीतुकयांच्या अभंग-गाथा दे. विझलेले निखारे पुन्हा फुलविण्यासाठी सामर्थ्यसमपन्न दासबोध दे.

हे प्रतापदुर्गे, तुझ्या महात्म्याचा संबळ दुमदुमविण्यासाठी इतिहासाचे संशोधक आणि अभ्यासक तुझ्या दारी उभे आहेत, त्यांना बुध्दीबळ दे ! उदयोस्तु अंबे उदयोस्तु !

— बाबासाहेब पुरंदरे



धियोयोनः प्रचोदयात्

विश्वामित्र प्रकाशन, पुणे